## अनुक्रम



• • •



प्रकाशक
श्री वि. दामले, बी. कॉम्.
एन्. के पब्लिशिंग हाऊस
६२७ बुधवार, पुणें २

• • •



• • •

मुद्रक
य. गो. जोशी, बी ए (ऑ)
आनंद मुद्रणालय
१९६।४६ सदाशिव, पुणें २

## श्या म ली : १

रात्रीं बाराचा सुमार असेल. सोमा वारली याच्या घरापुढच्या प्रशस्त जागेंत बरीच मंडळी जमली होती. दोन मोठ्या गॅसबत्त्या मध्यें झगझगत होत्या. घरांच्या भिंतीलगत दहावीस बायका जमल्या होत्या. लुगडयाची चौघडी पांघरलेली. बहुतेकींच्या कडेवर मूल आणि तेंहि उघडंबंब. कुणी बसल्या होत्या. कुणी संकोचानं उभ्या होत्या. पुढच्या बाजूंत पुरुषमंडळी बसली होती. अंगांत एक कांबळ्याचं किंवा खादीचं फाटकं जाकिटासारखं कुडतं, कानावरून एक रुमालवजा फडकं आणि कमरेला लंगोटी बसणं तरी कसं सर्वांचं सारखं. मांडी घालून बसणं त्यांना माहीतच नाहीं. नेहमीं उकडवं बसायचं. मग तें विश्रांतीसाठीं असो किंवा कामासाठीं असो. मध्यभागीं आमच्या संस्कृति पथकाचा कार्यक्रम सुरू होता. आषाढी एकादशीच्या निमित्तान भजन सुरू होतं.

त्या वाडयात पंधरावीसच घरं होतीं आणि बहुतेक मंडळी जमलेली दिसत होती. पलीकडच्या एका कुडाच्या दाराआड प्रकाश दिसत होता. तिथं राहात असलेल्या बायकांना भजनासाठीं बोलवावं म्हणून मीं सहज दार लोटलं आणि आंत पाऊल टाकलं.

खोली अगदीं लहानच होती. तिचे पुन्हा कूड घालून दोन भाग केले होते. पलीकडचं स्वयंपाकघर असावं. भिंतीशीं बाज होती. बाजेसमोरच्या भिंतीवर ढणाढणा पेटणारी चिमणी खिळ्याला अडकवून ठेवली होती. तिथंच एक अगदीं जुनं मीनाक्षी या सिनेमानटीचं चित्र चिकटवलं होतं. आणि जवळच टिनच्या चौकटीचा एक छोटा आरसा टांगलेला होता.

" बाई, देवाचं नांव ऐकायला चला कीं—" आंत येतांच मीं म्हटलं.

बाजेवरील स्त्रीनं पाघरलेल्या लुगड्याशीं जरा चाळवाचाळव केली आणि मान उचावून म्हटलं,

" या हा ना-बाई-मी धा दिसांतली आहें. मी कशी येव ना ? "

मी बाजेजवळ गेलें तों खरंच ! एक काळंभोर गुटगुटीत बालक तिथं चिमणीकडे पाहात मुठी चोखत पडलं होतं. उघडं, अगदीं उघडं. बाजेवरदेखील एक जुनेराचा फडका हंतरला होता आणि त्यावरच ती झोपली होती. तिनं पाघरलं होतं तेंच तिचं नेसूचं वस्त्र असावं.

" काय ग, मुलाला थंडी नाहीं का वाजत ? "

" वाजेऽत-ना कशी ? "

" मग त्याला अंगात-पाघरायला-? "

" घालू ना-त्यानं अज्जून आणला व ना-बसाऽहा ना " तिनं बाजेखाली पडलेल्या पाटवजा अरुंद फळीकडे बोट दाखवून म्हटलं.

तिचं बोलणं मोठं गोड, आर्जवी आणि किंचित् हेल काढून असं होतं. मी बाजेवरच बसलें. बाळाच्या अंगावरून हात फिरवला.

" माहां लेकरूं-बेस आहे ना ? " तिनं मला हंसतहंसत विचारलं.

" वा कितीतरी बेस- "

मग तिनं मला पडल्या पडल्याच सांगितलं. तिचा नवरा बुध्या वार्डांत कामाला होता. त्याला सर्व दिवसभर वार्डांतच खपावं लागे. तरी तो वेळ काढून घरीं येत होता. चार दिवस होतांच हीच घरांतील कामं आणि रांधणं करत होती. तिचं मूल फार सुख देणार होतं. मुळींच रडायचं नाहीं. सारखं झोंपूनझोंपून राहायच. आणि याचंच ती किती वेळ कौतुक करीत राहिली होती. एकदम तिला काय वाटलं कुणाला ठाऊक ! ती चटकन् उठून बसली. बसल्या बसल्याच लुगडं गुंडाळून घेत ती म्हणाली,

" बाई- चा-माझ्या हातचा चा-चालेल तुला- करूं ना थोडा-उला-उला — "

मी नको म्हणत असतांच ती बाजेवरून उतरली.

तिच्या या आदरातिथ्यानं माझा जीव दडपल्यासारखा झाला.

" नको, नको. तूं बैस. मी तुला चहा करून देतें आणि मी पण घेतें." म्हणत मी तिच्या अगोदर चुलीकडे गेलें. तिला बसायला दडी दिली. आणि चहाचं सामान जमवूं लागलें. स्वयंपाकघर कसं लख्ख होतं. दोनतीन गाडगीं होतीं तीं व्यवस्थित रचून ठेवलीं होतीं. ताब्याची एक छोटी कळशी दिव्याच्या प्रकाशांत झगझगत होती. दोन तीन शिंकीं टांगलीं होतीं. त्यांत कादे, वाळलेले मासे असं कांहींबाही ठेवलेलं होतं. एकच चुला होता पण स्वच्छ सारवून ठेवलेला होता. कोपऱ्यांत लाकडाची मोळी होती.

काटक्या लावून मीं विस्तव केला आणि ॲल्युमिनमच्या—तिथल्या एकुलत्या एक भाड्यांत चांगलं चार कप पाणी आधण ठेवून दिलं.

" बाई त्याला पण ठेवा न—" तिनं लाजत सागितलं.

एका गंजलेल्या सिगरेटच्या डब्यांत साखर होती. लिप्टन टी गर्लचं बारकं पुडकं तिथंच एका बारक्या फळीवर मुडपून ठेवलेलं होतं. शिंक्यावरील लोटक्यातून तिनं मला दूध काढून दिलं.

वाडगा भरून चहा मीं तिच्यापुढें केला. मीं अर्धा कप घेतला आणि तिच्या धन्याला थोडा झाकून ठेवला. गरमगरम चहाचे घुटके घेत ती किती वेळ बोलत राहिली होती—

तिचं नांव होतं पाकळी.

पाकळी चार वर्षांपूर्वी बहिणीच्या बाळंतपणासाठीं म्हणून या पाड्यांत आली होती. तेव्हांचीच गोष्ट—

कोसबाडच्या शेतकी शाळेंत कुणी बडे पाहुणे आले होते. त्यांना वारली लोकांचा नाच पाहायचा होता. आजूबाजूच्या पाड्यांतून तरुणांना बोलावून घेण्यात आलं होतं आणि रात्रीं शाळेसमोर नाच होणार होता. पाहायला खूप लोक जमले होते.

तारपं वाजविणारा मधें उभा राहिला आणि तरुणांनीं त्याच्या भोंवतीं फेर धरला. एक पाऊल पुढं व एक मागं टाकत त्याच वेळीं तालावर

टाळ्या देत नाच सुरू झाला. आणि नाचाचा एक विवक्षित फेर येताच एकदम त्या वर्तुळात एक तरुण शिरला. त्यानं आपल्या सर्वांगाभोंवतीं झाडाच्या डहाळ्या लावल्या होत्या मस्तकावरहि डहाळीचाच मुकुट होता त्यानं वर्तुळात येताच चारपाच वाकड्या-तिकड्या उड्या मारल्या आणि मग एकदम गाण म्हणायला सुरुवात केली.

" नाचूं कोठं रं—नाचू कोठं रं ! "

त्याचा तो प्रश्न होता. लगेच स्त्रियातून पाचसहा तरुणी उठून उभ्या राहिल्या आणि त्यांनीं उत्तर दिलं.

" धरतरीचे पाठी वरं रं ऽ "

त्यांचा बारीक चढा सूर तारप्याच्या आवाजात मिसळून जाऊन शेवटीं एकदम थाबे.

" धरतरी ती तूं माय रं ऽ
नाचूं कोठ रं ? "

पुन्हा स्त्रियानीं उत्तरं दिलीं.

" गावतरीचे मागावर रं ऽ "

छे ! गावतरी पण माताचा. मग कुठं नाचायचं ?

" बारडाच्या पायथ्यावरं "

छे ! तो तर पवित्र डोंगर—तो पिता—

" नाचूं कोठ रं ऽ ! "

पुन्हा प्रश्न आला.

क्षणभर सगळीकडे स्तब्ध झाल.

" नाची तूं नाची काळजावरी रं ऽ "

आता आवाज आला तो एकाच तरुणीचा—

" काळजावर नाच. "

तिनं म्हटलेले बोल म्हणून फेर धरणाऱ्यानीं द्रुत लयींत पावलं टाकलीं आणि "भिर्रर्र" असा आवाज करून वाकून नाच पुरा केला.

डहाळी बांधलेल्या व्यक्तीनं भराभर डहाळया फेकून दिल्या. आणि ज्या दिशेला तरुणी उभ्या होत्या तिकडे पाहिलं आपल्याला निरुत्तर करणारी कोणती तरुणी हेंच त्याला पाहायचं होतं सर्व त्यांत ओळखीच्या होत्या एकच त्यात अनोळखीची होती त्यानं तिच्याकडे निरखून पाहिलं

उफाड्या बांध्याची चांगली अठरावीस वर्षांची ती पोर होती शेंदरी रंगाचं पातळ ती अगदीं चोपून नेसली होती अजून लग्न झालं नसावं, कारण अंगावर पदर नव्हता. रुप्याच्या सऱ्यापुतळ्यांनी तिचा गळा भरून गेला होता तिनं केसहि व्यवस्थित विंचरले होते आणि अंबाड्याच्या बाजून चकचकीत पिना लावल्या होत्या. आकुरीच्या गेंदेदार फुलाचे गुच्छ तिनं आबाड्यावर खोवले होते ते पुढूनहि दिसत होते. त्याचं तें डोळे विस्फारून पाहणं पाहून तिला हंसूं आलं कीं काय कोण जाणें ती हसली तेव्हां तिचे पांढरेशुभ्र दात इतके मोहक दिसले !

" कोणाची रा पोयरी ही ? " त्यानं बाजूच्या एका तरुणाला हळूच विचारलं.

" तीत ती नवशाची साली ना. "

" नवशाची साली–" तो हळूच पुटपुटला.

दुसऱ्या नाचांना सुरवात झाली. दर नाचांत त्याला नाचावंच लागे. आजूबाजूच्या दहावीस खेड्यांतलि नाचणाऱ्या तरुणांत तो अग्रणी होता. त्याचं नाव होतं बुध्या.

नाच संपतांच सर्व आपापल्या घरीं निघाले. बुध्या मुद्दाम त्या तरुणींच्या घोळक्याजवळ आला. त्या हंसतखिदळत चालल्या होत्या. त्याला पाहतांच सगळयाजणी मोठ्यानं चीत्कारून हंसल्या आणि त्याला त्यानीं आपल्या गप्पांत सामील करून घेतलं. बहुतेक वाटभर तो पाकळीशींच बोलत होता.

तिचं घर जवळ आलं तसं त्यानं विचारलं, " आतां किती दिस राहणार तू ? "

" आणि महिनाभर-घरीं आई एकलीच हां " तिनं त्याच्याकडे पाहात सांगितलं

इतर वारली तरुणापेक्षा बुध्या कितीतरी वेगळा दिसे तो एका पारशाकडे त्याच्या वाडींत कामाला होता. त्यामुळं त्याचं बोलणंवागणं जरा नागरी वळणावर होतं. तो अंगात कोट घालत असे. डोक्यावर त्यानं केस ठेवले असून तेल लावून भाग पाडून ते विंचरलेले असत. दिसायलाहि तो देखणा होता.

" तुझं नाव तर सांगशील-" तिनं हंसत म्हटलं.

" बुध्या-मी येईन नवशाकडे-"

" कधीं ? "

" बघाव ते-तूं असे तूं-"

" हां हा. " म्हणत ती झपाट्यानं आपल्या घराकडे वळली. अंबाडया-मधील आकुरीचा गुच्छ काढून त्याचा तिनं मनसोक्त वास घेतला. तो नवशाकडे येणार होता कशाला हें का तिला समजत नव्हतं ?

तिनं रोज वाट पाहावी पण तो कधीं आला नाहीं आपण पाण्या-साठीं, कशासाठीं बाहेर जाऊ आणि त्याच वेळीं तो येऊन जाईल असं तिला सारख वाटे. आणि शेवटीं झालंहि तसंच.

एके दिवशीं मासे आणण्यासाठीं ती झाईच्या खाडीवर गेली. लांबचा पल्ला असल्यानं यायला तिला बरीच सध्याकाळ झाली. ती घरांत आली तों दिवे लागले होते. तिची बहीण भाकरी थापत होती. नवशा विडी ओढत दडीवर बसला होता. कुणीच कुणाशीं बोलत नव्हतं. काहींतरा घडलं आहे हें तिनं हेरलं. पण तिला फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. तिची बहीण एकदम उसळून म्हणाली,

" तो बुध्या म्हणत कसा -' तुझ्या घरां आकुरीचा फुलाचा वास आला,' म्हणून आलाव-मेल्या."

नवशानं एक जोराचा विडीचा झुरका घेतला.

" पण तूं कां रागावतीस ! मीं त्या सांगलं आठीसा रुपय दे आन् तुझी फुलां घेवनी जा. आतां तो ना येणार. "

पाकळीनं ती रात्र तळमळून काढली. बुध्यानं मागणी घातली होती. पण नवशाला मुलीचे पैसे म्हणून एकशेंसाठ रुपये हवे होते. तो ते देऊं शकणार होता काय ?

दुसरे दिवशी ती नेहमीप्रमाणें जळणकाटूक आणायला रानांत गेली. तिथंच बुध्या तिला भेटला होता. तिला त्यानं फाद्या तोडून दिल्या होत्या आणि शेवटी डोळ्यात पाणी आणून म्हटलं होतं–

" पाकळी, एकशेंसाठ रुपये मी कसे देणार ! आईच्या मरातिकाचं रिण शंभर रुपयाच आहे. त्यासाठींच आज दोन वर्षं पारशाकडे राबतों आहे. तो पारशी मला आणखो पैसे देत नाहीं "

तिनं त्याची समजूत घातली होती आणि काहीं बेत सागितला होता. ते ऐकून तो खूप हसला होता. आणि आनंदाच्या भरात तिची मोळी त्यान तिच्या घरापर्यंत आणून पोचती केली होती.

पाकळीनं सारखा आईकडे जाण्याचा हट्ट धरल्यानं नवशाला तिला लवकरच घरीं पोचती करावी लागली. घरापासून चार मैलांवर मोटरचा रस्ता होता आणि पाकळीचं घर या मोटरनीं गेलं तर ४० मैलावर होतं. ज्या दिवशीं पाकळी निघाली त्या दिवशीं तिची बहीण तिला वेशीपर्यंत पोचवायला आली. बहिणीची मोठी मुलगी तिला मोटररस्त्यापर्यंत पोचवणार होती. मिठी मारून, रडून निरोप घेतल्यावर मावशी आणि भाची रस्त्याला लागल्या आणि सडक येतांच मोटरची वाट पाहात बसल्या. थोडया वेळानं आपल्या गळ्यांतील सर्व दागिने काढून फडक्यांत बांधून भाचीकडे देत पाकळी म्हणाली,

" मला डागिन्याचं भे वाटतं. मी एकली जाणार न–होत-तुझ्या आईचे–ते घेवता जा."

भाचीहि चालून आणि बसून कंटाळलीच होती. तिनं दिलेलं गाठोळं घेऊन ती परतली. संध्याकाळच्या सुमाराला उलट दिशेनं येणारी मोटर तिथं थांबली आणि तींतून बुध्या उतरला !

पाकळी बुध्याच्या घरीं आली आणि तेव्हांपासून त्या दोघांचा असा संसार सुरू झाला.

बुध्याच्या घरीं तिला खूप कष्ट पडत. बुध्या व्याजासाठीं वाडीवर खपत असल्यानं संसाराच्या मदतीसाठीं तो काहींच करूं शकत नसे. पाकळीनंच जंगलात जावं, जळण गोळा करावं, शहरात नेऊन विकावं, जे आठबारा आणे जमतील त्याचं जेवण तयार करावं. कुठं मजुरीला जावं, कुठ कळकाचे कोंब विकावे अशा गोष्टींनीं दुपारची चूल सुरू करावी. ज्या दिवशीं कांहीं नसेल त्या दिवशीं खुशाल उपाशीं राहावं !

" नाय मिळेल तां नाय खायेल आपला काय ? " असं हंसतहंसत बुध्याला म्हणावं आणि दोघांनीं मिळून खळखळून हंसावं.

त्यानीं लग्न केलं नव्हतं. करायची सोयच नव्हती. लग्न म्हणजे विधि आला, ताडी आली, जेवण आलं. यासाठीं पैसा नव्हता. लग्न-बंधन जरुरीचं आहे असं त्याचा समाजहि मानत नव्हता

कधींतरी पाकळीनं लग्नाची गोष्ट काढली कीं बुध्या म्हणे–

" करूं ना. आपल्या पोराचे लग्नाच्या माडवात आपले लग्न करूं हां–" आणि खोखो हंसत सुटे.

या त्याच्या आनंदात भर म्हणूनच आता त्याना मुलगी झाली होती. त्यांच्या संसारसुखाला सीमा नव्हती.

* * *

पाकळीनं हंसत, लाजत, मुरकत हकीगत संपवली. आणि एकदम उठून ती बाजेकडे धावली. त्या लहानग्या अर्भकाला उचलून घेऊन त्याचे पटापट मुके घेऊन त्याला तिनं बेजार केलं. तिचं तें उफाळून आलेलं वात्सल्य मी पाहातच राहिलें. दारिद्र्यानं विदीर्ण झालेल्या जीवनांतील तो ओसंडून वाहणारा जीवनानंद मला प्रत्यक्ष दिसत होता.

" बाई, नाव सांग ना पोयरीला. म्हंजे तुझ्या आठवणीनं हाका मारूं– "

" नाव-मी सागूं ? हाक मारशील तशी-"

" हां त-"

क्षणभर विचार करून मीं म्हटलं,

" श्यामली " म्हण तिला

" सावली ? "

" अं हं. श्या-म-ली-" तिच्याकडून तें नाव मी दोनतनिदां म्हणून घेतलं.

" श्यामली- श्यामली- "

तितक्यांत दार लोटून बुध्या आंत आला. त्याच्या हातांत विडी होती. ताडीचाहि सूक्ष्म दर्प येत होता मला पाहताच तो संकोचल्या-सारखा झाला. त्यानं विडी बाजूला टाकली आणि तो कोपऱ्यात उभा राहिला.

" बाईनं चा केला— पी ना- जा आन् पोयरीला म्हणाली— श्यामली—"

दोघाच्या चेहऱ्यावर आनंद इतका ओसंडून आला होता ! मी हळूंच बाहेर आलें तरी तें त्याच्या लक्षात आलं नाहीं. बाहेर येऊन कुडाचं दार हळूच ओढून घेतलं.

आंत दोघाचा मिळून आवाज येत होता.

"श्यामली-श्यामली—"



दाराशी नऊ खांबाचा लहानसा माडव घातला होता. माडवात एक खांब रोवून त्याच्याजवळ आब्याचीं पानें, नारळ, सुपारी असं सामान ठेवलं होत. एवढंसं घर आणि एवढासा माडव, पण त्यातून चाळीस पन्नास माणसाची सारखी ये-जा सुरू होती. नवरानवरीला खांबाजवळ बसवल होतं. पिवळ्या जर्द हळदीनं चित्रित केलेल्या मडक्याला एक लहानसं भोक पाडून त्यातून वधूवराना ताडी देण्यात येत होती. मागून स्त्रिया गाणें म्हणत होत्या.

"आबा पडेल ता चीच धरेल
ना चीच पडेल ता आंबा धरेल-"

आंबा पडूं लागला तर चिंचेनं त्याला सावरावं; चिंच पडूं लागली तर आब्यानं तिला सावरावं. दोघानींहि एकमेकाला आधार द्यावा. त्या वधूवरांना हा संदेश आळवून आळवून दिला जात होता.

ज्या वेळीं देवली एकटी असे, त्यावेळीं आपल्या लग्नातील हा सोहळा तिच्या मनापुढं अचूक उभा राही. आणि तिचं चित्त व्यथित होऊन जाई. कृश पण पीळदार शरीरयष्टीचा राघ्या—पण तिच्यासमोर बसलेला, तिच्याबरोबर ताडीचे घोट घेणारा राघ्या नव्हता. तिच्या बापानं तिचं लग्न हाल्याशीं जमवलं होतं. हाल्याशीं आपल्या लग्नाचा बोल केव्हा झाला, हें तिला माहीतहि नव्हतं, इतकी ती त्यावेळीं लहान होती. कुणीतरी माणसं आलीं होतीं, आणि आपल्याला एक लाल साडी मिळाली होती, आणि ती साडी आपण कितीतरी वर्षं पेहरत होतों, इतकंच काय तें तिला आठवत होतं.

हाल्याशीं बोल झाल्यानंतर देवलीच्या बापानं त्याला कितीदां तरी आपल्या घरीं रहायला बोलावलं असेल. पण हाल्या आला नव्हता. देवलीच्या बापाला देवलीखेरीज दुसरं कोणी नव्हतं. जावई घरीं असावा अशी त्याची फार इच्छा. पण हाल्याचा स्वभाव चमत्कारिक. सासऱ्यानं बोलवावं आणि जावयानं जाऊं नये, असंच चाललं होतं.

देवलीच्या घरची परिस्थितिहि अगदीं गरिबीची. बाप दिवसभर कष्ट करून जे पैसे मिळवी त्यांतले बहुतेक तो ताडींत घालवी. जे कांहीं उरतील त्यात घर चालवावं लागे. देवलीच्या आईला तर मलेरियानं पुरं जेर करून सोडलं होतं. घराच्या पुढच्या दाराशीं एक फाटकं फडकं टाकून त्यावर ती सदा झोपलेली असे. घरात करणारी काय ती देवली. तिला कळायला लागल्यापासूनच ती घरांत मदत करूं लागली होती. घर झाडणं, भांडीं घासणं, पाणी भरणं, होईल तेव्हढं राधणं, हीं कामं तिलाच करावीं लागत. परसात एक तोंडल्याचा माडव होता. सकाळीं उठून त्याचीं तोंडलीं काढावीं अन् गावांत विकायला न्यावीं, या कामाची तिला फार आवड. कारण याच वेळीं तिला काय तो विरंगुळा मिळत असे. अशा परिस्थितींत देवलीच्या बापाला जांवयाची जरूर वाटावी यात काय नवल ?

पण एके दिवशीं देवली तोंडलीं विकून गावातून परत आली ती किती विलक्षण बातमी घेऊन !

त्या दिवशीं देवली नित्याप्रमाणें सकाळीं उठली. गाडग्यांत तिनं डाळभात राधून ठेवला. चहा उकळला; एक वाडगा आईपुढं ठेवला व एक आपण घेतला चहा त्या दोघीच घेत आणि तोहि कोरा. कारण दूध कोठून आणणार ? अंगातील चोळी नि कमरेचं फडकं नीट करून आणि कांखेंत टोपली घेऊन ती निघाली. देवली आता पंधरा वर्षाची असल्यानं चांगलीच भरलेली दिसत असे. नेसूचं फाटकं तुटकं असलं तरी गळ्यांत तांबड्या पिवळ्या मण्यांच्या माळाचीं जूड, हातांत पितळेची पाटलीवजा कांकणं, केसांच्या घट्ट बांधलेल्या

आंबाड्यावरील फुलाची वेणी एवढ्याच शृंगारानं ती गौरीसारखी सजलेली दिसे

गावांत येतांना वाटेंत पावळ्याची खाडी लागे. तें तिचं मोठं आवडतं ठिकाण होतं तिथल्या त्या मोडक्या पुलावर टोपली ठेवून खाडीच्या पाण्यात थोडा वेळ खेळल्याशिवाय ती कधीं पुढे जायची नाहीं. आज त्या खाडीजवळ येताच तिला आठवण झाली; आज किती दिवसांत तिनं स्नान केलं नव्हतं विचार मनात येण्याचा आवकाश, टोपली एका दगडावर ठेवून ती पाण्यांत शिरली. एक चांगलासा दगड पाहून त्यावर ती बसली अंगातील चोळी काढून तिन ती बसल्या बसल्याच घासून धुतली, पिळली आणि अंगांत घातली बारीकशा कपरीनं हातपाय घासून धुतले तोंड लख्ख केलं आणि ती टोपलीकडे आली.

" ये पोयरे, कुटं चाललीऽ "

मागून तिला हाकारलं तेव्हा तिनं चटकन मागें वळून पाहिलं. खाडीच्या दुसऱ्या तीरावर शेजारच्या पाड्यातील राध्या उभा होता. आणि खदाखदा हासत होता

" का रं ऽ ऽ ? "

" कुटं हाल्याकडं निघालीस जणूं ! "

" नाय नाय. अजून लगीन नाहीं न्हालांव न–"

" देवली, तुला एक गोष्ट हागू काय ? " पाण्यातून तिच्या जवळ येत तो म्हणाला.

" काय ती ? "

" तो हाल्या नाय ? तो रोज झुरळीच्या घरांत जावन बसतस— लक्षण काय ठीक नाय दिसं—"

" झुरळी ? ती लाडक्याची बाईल ? "

" हां त—"

आणि हें जें तिनं राध्याकडून ऐकलं तें घरीं येऊन बापाला सांगितलं होतं.

आणि याचा परिणाम म्हणूनच कीं काय हाल्याच्या आईच्या हाता-पायां पडून त्यानं लग्न उरकून घ्यायचं ठरवलं. बोल झालेलाच होता. त्यामुळं लग्न हाल्याशीं व्हायचं हें देवलीनं गृहीतच धरलं होतं पण लग्नात राहून राहून तिला राध्याची आठवण येई.

त्या दिवसापासून राध्या तिला रोज पावळ्याच्या खाडीवर भेटूं लागला होता. त्याची ओळख वाढली होती. शिवाय हाल्यापेक्षां राध्या दिसायला कितीतरी चांगला होता सबंध लग्नसमारंभांत तिला चुकल्या-सारखं वाटत होत. लग्नाच्या दिवशीं माडवात खाबाशीं उभी राहून तिन हाल्यानं तोडून उडवलेली उंबराची फादी झेलायची होती. पण राध्याकडे लक्ष जाऊन तिला ती झेलता आली नाहीं.

लग्न झाल्यावर बायकोच्या ओढीनं तरी हाल्या आपल्या घरीं येऊन राहील, अस देवलीच्या बापाला वाटलं होतं, पण तो तर्क खोटा ठरला. हाल्यानं लग्नानंतर देवलीलाच माहेरीं जाण्याची बंदी केली. देवलीचं नशीबच जणूं खोटं होतं. नवऱ्याच्या घरींहि तिला सुख नव्हतं !

हाल्या घरीं असा कधीं नसायचाच. आणि जो यायचा तो ताडीनं तर्र होऊन ! लग्न होऊन चार वर्षं होत आलीं, दोन मुलं झालीं, तरी नवऱ्याशीं कधीं सुखाचे चार शब्द बोललेले देवलीला आठवत नव्हते. अलीकडे तर त्यानं मारझोड करायलाहि सुरवात केली होती.

देवलीला हें सर्व असह्य झालं आणि तिनं काडीमोड घ्यायची ठरवली.

बायकानीं आपण होऊन काडीमोड घेणं हें काहीं चागलं समजत नाहींत. काडीमोड घेणाऱ्या बाईविषयीं लोक नाहीं नाहीं तें बोलूं लागतात. देवलीबद्दलहि तसंच झालं. तिनं काडीमोड घेणार असं जातेल्याला सांगितलं मात्र, तिच्या चारित्र्याविषयीं तिच्या जातींत चर्चा होऊं लागली. कोणी तिला आणि राध्याला जाता येतां पाहिलं होतं, त्याना तर आयतंच फावलं.

ज्या दिवशीं तिनं काडीमोड घेतली त्याच दिवशीं संध्याकाळीं दोन

मुलांना घेऊन ती राध्याकडे रहायला गेली. राध्यानं तिचं आनंदानं स्वागत केलं. पण शेवटीं तो म्हणाला,

"हीं पोरं कशाला आणलीं बरोबर?"

' हीं त-माही पोरा!"-देवलीन दोघानाहि पोटाशीं धरल.

राध्याचं घर म्हणजे एक कुडाची खोली. कुणाच्या तरी वाडींत तो काम करी आणि पोट भरी.

देवली घरात आल्यापासून घराला रूप आलं. घरांत तिनं गाडग्गीं मडकीं आणलीं, चूल थापली, कूड शेणामातीनि सारवलं नव्याच्या पुनवेला कुडावर तांदळाच्या पिठाच्या मुठी काढल्या. चित्रं रेखलीं. राध्याला दोन्ही वेळेला सुग्रास जेवायला मिळूं लागलं. जन्माला येऊन आता तरी दिवस सुखानं जातील अशी तिला आशा वाटूं लागली.

त्या दिवशीं रात्रीं बारा वाजून गेले होते. बाहेर टिपूर चादणं पडलं होतं. देवलीच्या घराच दार अजून उघडंच होतं. उंबऱ्याशींच एका फडक्यावर दोन्ही पोराना निजवून देवली कुडाच्या भिंतीला रेलून विडीचे झुरके घेत बसली होती. राध्या शेजारच्या पाड्यात नाचामधें तारपें वाजवायला गेला होता. तो येण्याची वेळ होऊन गेली होती. तो आल्यावर तीं दोधं मिळून जेवणार होतीं. तावड्या जोंधळ्याच्या आबोळीसारख्या भाकरी भाजून तिनं फडक्यांत गुंडाळून टोपलींत ठेवून दिल्या होत्या चुलीवर गाडग्यात माशाचं कालवण तयार ठेवलं होतं आणि ती त्याची वाट पाहात होती.

गुंजाच्या वेलीच्या कुंपणात खसखस ऐकूं आली तशी ती हातातील विडी टाकून उभी राहिली. राध्या येत होता. त्याला तिनं ओळखलंच. पण बरोबर आणखी कोणीतरी होतं. त्यालाहि तिनं ओळखलं तो हाल्या होता. ते दोघंहि झिंगत झिंगत येत होते. ती मनात चरकली. झोंपलेल्या दोन्ही मुलांना एकदम उचलून तिनं आंत चुलीपाशीं निजवलं आणि कुडाचं दार लोटून घेऊन ती अंगणांत आली.

आणि मग तिघांचंहि चागलंच भाडण जुंपलं. शेजारी जागे झाले, आणि त्यांनीं हाल्याला मोठ्या प्रयासानं परतवून लावलं. हाल्या

निघून जातांच राध्यानं देवलीला खूप बडवलं. चुलीवरील गाडगंहि फुटलं आणि माशाचं कालवण जमिनीवर सांडून गेलं.

नाचाच्या वेळीं राध्याला हाल्या भेटला होता. त्यानं राध्याकडे देवलीच्या लग्नाच्या पैशाची मागणी केली होती. मुलंहि आपल्या ताब्यांत देण्याविषयीं तो बजावत होता, आणि या कारणानं भाडण झालं होतं. पैसा देण्याला राध्या तयार नव्हता. मुलं देण्याला देवली तयार नव्हती.

हाल्या दोन चार दिवसानीं देवलीकडे येऊन धरणं धरून बसे, 'तुझ्या बापाला लग्नात दिलेले पैसे टाक' म्हणून तो तिच्या मागें लकडा लावी. मुलाची मागणी करी. त्यांचीं भांडणं लागत

कधीं कधीं राध्या कामावरून येई तेव्हा त्याला देवली पोटाशीं पोरं घेऊन रडत बसलेली दिसे. घरात चूल थंड असायची. मग तोहि संतापे त्यालाहि देवलीचीं मुलं नको होतीं. तो त्याच्याकडे लक्षच देत नसे. दोघंहि मुलं खरजेनं माखलीं होतीं. धाकट्याचं पोट तर भोपळयासारखं पुढं आलं होतं. देवली कांहीं औषधपाण्याचं बोलली कीं तो म्हणे—

"त्या हाल्याला हाग ना–"

आणि तो असं म्हणाला कीं पुनः त्यांचीं भाडणं सुरू होत.

देवलीच्या मनात आपल्या थोरल्या लेकाच्या कमरेंत पितळेचा करदोटा घालावा असं होतं. तिनं ज्या दिवशीं तो विषय काढला त्या दिवशीं तर त्यांचं भाडण इतकं विकोपाला गेलं कीं, राध्यानं रागाच्या भरांत दोन्हीं मुलं झोपडीबाहेर काढून दिलीं.

घरात असं हें असमाधान असतांच देवलीला मुलगी झाली. राध्याला फार आनंद झाला. मुलीचं नाव त्यानं मंगू असं ठेवलं, आणि महिन्याच्या दिवशीं मुलीच्या गळ्यांत, कमरेंत आणि पायात घालण्यासाठीं रुप्याचीं लेणीं करून आणलीं. तीं लेणीं पाहतांच देवलीचं रक्त उसळून आलं. तिनं तीं भिंतीवर फेकून दिलीं. आणि हें भांडण

इतकं विकोपाला गेलं की राध्यानं त्या महिन्याच्या बाळंतिणीला मरे-पर्यंत काठयानी बडवून काढलं बिचाऱ्या मुलानाहि लाथेनं तुडवलं.

त्या रात्रीं देवलीला झोंप आली नाही. रात्रीं ती बाजेवरून उठली तेव्हा तिची दोन्ही मुलं खाली जमिनीवरच झोपलीं होती. राध्या कुडाच्या भिंतीशीं घोरत पडला होता. ताडीच्या घाणीनं खोली दर-वळून गेली होती.

देवलीनं हलकेच कुशींतील मूल बाजूला केलं. उशाला घेतलेलं लुगडं अगाभोंवती गुंडाळून घेतलं. खाली निजलेल्या दोन्हीं पोराना तिनं अलगद खाद्यावर आणि काखेत घेतलं, आणि ती कुडाचं दार ढकलून बाहेर पडली तिनं बाबळया तलावाचा रस्ता धरला झपाझप पावलं टाकत ती तळ्यापाशीं आली. तळयाच्या काठावर क्षणभर देखील न थाबता तिनं तीं झोपलेलीं बाळं तळयात बुडविलीं, आणि ती परत फिरली, आणि हळूच दार उघडून घरात शिरली

पहाटेलाच राध्या जागा झाला. त्याचं बाजेकडे लक्ष गेलं. देवली गाढ झोंपली होती काठीचे काळेनिळे वण तिच्या उघड्या दंडावर, गळ्यापासल्या भागावर व कपाळावर तट्ट फुगून आले होते. आणि ती राध्याची तान्ही मुलगी तिचा पुष्ट स्तन हातात धरून चुरू चुरू चोखत होती.



## मला भीति वाटते हो! : ३

लीला केशवला स्टेशनवर पोचवून घरीं आली ती इतक्या कष्टी मनानं! घर जवळ आलं तसं घरीं आतां जाऊंच नये असं तिच्या मनानं घेतलं. पण तिला आता घरीं गेलंच पाहिजे होतं.

तिनं दाराशीं पायातील चपला काढल्या आणि ती आंत शिरली. सोप्यात तिचा धाकटा दीर सायकलचं पंक्चर काढत बसला होता. भावाला पोचवायला न येता भलत्या वेळीं त्यानं हें काम काढलेलं पाहून तिला आधीच चीड आली होती. ती स्टेशनवरून आली तरी तो तेंच काम मांडून बसलेला पाहून तिच्या कपाळावर आधिकच अठी पडली. माजघरांत झोपाळ्यावर तिची नणंद स्वेटरचे टाके घालत बसली होती.

"वैनी, जरा टाके दुरुस्त करून या हो!" लीलाला पाहतांच ती उठली.

"नाहीं हो; आता नको, मग–" असं पुटपुटत ती स्वयंपाकघरांत गेली. सासूबाई बहुतेक बाहेर गेल्या असाव्या. दोन फुलपात्रं माठातील पाणी पिऊन ती आपल्या खोलींत आली आणि विकलतेनं तिनं आपलं शरीर पलंगावर लोटून दिलं. "केशवाशिवाय या घरांत राहायचं तरी कसं–" तिच्या मनाचा ताण तिला असह्य झाला होता. तिचं लग्न होऊन तीन वर्षं झालीं होतीं. पण अजून ती घरांतील मंडळींत मिसळून जाऊं शकत नव्हती. केशव घरीं असला कीं ती सर्वांशीं खेळीमेळीनं वागे. दिराशीं, नणंदेशीं हास्यविनोद करी. पण तो शाळे-

निमित्तान बाहेर गेला कीं, कमलाच्या पाकळ्या मिटून जाव्या तशा तिच्या साऱ्या वृत्ति मिटून जात. आता तर केशव वर्षभर बेसिक कोर्ससाठी बोर्डीला जाणार होता आपल्या नाशिबात सुखच नाही असा विचार तळतळून तिच्या मनात आला आणि डोळ्यात पाणी उभं राहिलं या दोन वर्षांत तिला तसाच अनुभव आला होता. तिचं लग्न झाल आणि त्याच वर्षी केशव कादिवलीच्या फिजिकल ट्रेनिंगच्या कोर्ससाठीं गेला होता. गेल्या वर्षभर त्याला फिरतीचं काम असल्यानं तो घरीं असूनहि त्याना वारंवार दूर राहावं लागत होतं. आणि आता या वर्षी तर तो पुन्हा एक वर्ष शिक्षणासाठीं जात होता !

या विचारांनी तळमळत ती पलंगावर पडली होती सहज तिच लक्ष टेबलाकडे गेलं "अरे, माझा फोटो !" तिला एकदम हुंदका आला तो आवरला नाही. केशव जाताना तिचा फोटो घेऊन गेला होता. आणि त्या जागीं त्यानं नवं कोरं निळं पत्र लिहिण्याचं पॅड आणि निळीं उंचीं पाकिटं ठेवून दिलीं होतीं.

तिला काय वाटलं कुणास ठाऊक, चटकन् ती टेबलाशी जाऊन बसली आणि तिनं पत्र लिहिण्यासाठीं पॅड पुढं ओढलं

या तिच्या रोजरोज लिहिल्या जाणाऱ्या पत्रांनीं केशवचं शैक्षणिक रूक्ष जीवन रसपूर्ण करून टाकलं होतं. रोज सकाळीं नऊ वाजले की, वर्गात त्याच्या हातातील हातोडी तशीच राही सुताचा धागा चातीभोवतीं गुंडाळण्याचंहि त्याला अवधान राहात नसे. एकदा पत्र हातीं आलं कीं मग तें खिशात ठेवून त्यानं कामाला सुरवात करावी. त्याचीं हीं पत्रं म्हणजे विद्यार्थ्यांच्या गोड थट्टेचा विषय झाला होता

तिन्हीसाजा टळून गेल्यावर समुद्रकाठीं जरा फेरफटका करायला तो जाई. वरचं तें असंख्य नक्षत्रांनीं खचलेलं आकाश आणि खालचा तो विस्तीर्ण जलाशय पाहून त्याचं मन भरून येई "खरंच आता लिला इथं असायला हवी होती !" असं वाटून त्याच्या पापण्याच्या कडा ओल्या होत. दोन वर्षांचा सहवास पण पोरीनं किती जीव लावून ठेवला आहे याचं त्याचं त्यालाच आश्चर्य वाटे. कुंपणाला मेंदीचे नाजूक

घोस ओथंबून आलेले असत, सुगंधानं व्याकुळ झालेलं त्याचं मन अधिकच व्यथित होई आकर्ण पोचणारं चक्कर घातलेली पाठमोरी लीला त्याच्या मनश्चक्षूंपुढं दिसूं लागे तिनं येतांना बरोबर करून दिलेले फराळाचे जिन्नस जसे संपत आले तसा त्याला लीलाचा विरह अधिकच जाणवूं लागला लीलानं रात्रीं दोन वाजेपर्यंत जागून तळ- लेल्या चकल्या संपल्या, चिवडा संपत आला, तशी त्या त्या रूपानं लीलाच आपल्यापासून दूर जात आहे असं त्याला वाटूं लागल. तिनं नक्षीकाम केलेले टेबलक्लॉथ त्यानं आपल्या खोलींतील मेजावर पसरलं होतं. उशांच्या अभ्ऱ्यावरील आणि पलंगपोसावरील नक्षीकाम तर येणाऱ्याजाणाऱ्यांच्या कौतुकाचा विषय होऊन राहिलं होतं आणि पावलोपावलीं लीलाच्या आठवणीनं त्याचं मन भरून येत होतं. कुठं ते लीलाच्या हातचं नाजूक जेवण आणि कुठं हे भटारखान्यात शिजलेले पदार्थ ! वर्षभर तो कादिवलीला राहिला होता पण त्या वेळीं कांहीं लीलाच्या आठवणींनीं त्याला इतकं भारून टाकलं नव्हतं !

अशा मनाच्या परिस्थितींतच त्याला जेव्हा समजलं कीं, पुढील पंधरवड्यांत चार दिवस लागोपाठ सुट्टीचे येणार आहेत, तेव्हां त्याच्या आनंदाला सीमा उरली नाहीं त्यानं खसकन पॅड पुढं ओढून पत्रानं ही बातमी लिलीला कळवायची असं ठरवल. पण लगेच पुनः पॅड फेकून दिलं " बस्स, एकदम जाऊन लिलीच्या पुढं उभा राहायचं ! " या गोड विचाराच्या तंद्रींत त्यानं सिगारेटचे मनसोक्त झुरके घेण्यास सुरवात केली. पण सुटी पडायला अजून पधरा दिवस अवकाश होता. तोंपर्यंत शिक्षणाचं राहाटगाडगं सारखं चालू ठेवणं भाग होतं एका लाथेसरशी हे पंधरा दिवस आकाशात उडवून देता आले तर किती बहार होईल, अशी जाणीव त्याला क्षणोक्षणीं होत होती.

त्या दिवशीं सकाळीं लीला न्हाऊन केस पुशीत माजघरात उभी होती. दारात बुटाचा खाडखाड झालेला आवाज तिला अत्यंत परिचयाचा वाटला. स्नानानं लालबुंद पडलेल्या तिच्या चेहऱ्यावर अधिकच लाली उसळून आली. एकदम हृदयस्पंदन बंद पडल्यासारखं तिला

वाटलं, "छे, ते कसे येतील!" असं ती पुटपुटते तोंच दाराशीं हातांत बॅग घेऊन केशव उभा होता.

"अय्या! तुम्ही?" तिनं हातांतला टॉवेल तिथंच फेकला आणि भरकन् केसाचा अंबाडा बांधला. तिच्या चेहऱ्यावरील उसळून आलेला आनंद आणि आश्चर्याचा भाव केशवला इतका गमतीचा वाटला! याच भावदर्शनाचं यथेच्छ पान करण्यासाठीं त्याचे डोळे भुकेले होते. तिन चट्कन् त्याच्या हातातील छोटी बॅग बाजूला ठेवली, हॅट खुंटीवर अडकवली. आणि त्याच्या स्नानाची व्यवस्था करण्याकरितां ती स्नान गृहात गेली. तिच्या चालण्यातील अल्लड भाव पाहून केशवला हसूं आल्याशिवाय राहिलं नाहीं. गरमगरम पाण्यानं स्नान केल्यावर केशवला किती हुशारी वाटली सुखाच्या कल्पना किती सापेक्ष असतात! जेवण करताना त्याला आपण बादशहाचं वैभव भोगीत आहों असं वाटल्याशिवाय राहिलं नाहीं त्याला गरम कुडकुडीत भाकरीची खोड म्हणून त्याची आई मुद्दाम भाकरीच्या पिठाचा गोळा शिल्लक ठेवून बसली होती तो जेवायला बसताच तिनं भाकरी तव्यावर टाकली. लीला त्याला मृदु स्वरात आग्रह करून पदार्थ वाढत होती. आणि त्याची बहीण शाळेंतील गॅदरिंगच्या मौजा सांगून सागून सर्वांस हसवीत होती. हें असलं भोजनसौख्य तो आतांपर्यंत अनुभवीत आला होता. पण दोन महिन्याच्या त्या शिक्षणक्रमात हें अंतरलेलं सुख आता पुनः त्याला लाभत होतं, आणि तेंहि कोटि पटींनीं वाढून!

जेवण झाल्यावर त्यानं जें झोपून दिलं तें पांच वाजतां त्याला जाग आली आणि तीहि लिलाच्या हातून जमिनीवर कांहीं पडल्याच्या आवाजानं!

"काय मेले हात तरी– किल्ल्या पडल्या खालीं! जाग आली ना त्यानं तुम्हाला–" केविलवाण्या स्वरात लीला म्हणाली.

"येऊं दे ग–" त्यानं मोठा आळस दिला.

"चहा घेऊन येतें हं–" ती आत गेली. चहाबरोबर तिनं खारीं असवार कडबोळीं आणलीं.

" वा वा! आतांच बनवलींस?"

" हो ना. घ्या- बघा तरी- " तिनं अर्धा तुकडा त्याच्या तोंडांत घातला.

" तुमच्या बॅगच्या किल्ल्या या बघूं- मघा त्याच तर शोधत होतें—"

" अस्सं- पण मीं काहीं खाऊ आणला नाहीं तुझ्याकरितां- लहान मुलात आणि बायकात फरक नाही."

" पण महाराज, बघा तरी मी तुमच्या बॅगमधून काय काढणार आहे तें- " पाकिटातून किल्ली घेऊन तिनं बॅग उघडली. बॅगमधें मळके लेंगे, मळके शर्ट दडपले होते. ते तिनं बाजूला काढले, आणि आंत अस्ताव्यस्त फेकलेल दाढीचं सामान बाहेर काढलं.

केशव केवळ्यादा हसला!

" अरे बापरे-विसरूनच गेलों होतों!" म्हणून त्यानं आपल्या गालावरून हात फिरविला.

तिनं तें सामान व्यवस्थित टेबलाशीं मांडलं. एक स्वच्छ नॅपकिन त्याच्या खांद्यावर टाकला आणि कढत पाणी आणण्यासाठीं ती पुनः स्वयंपाकघरात गेली.

" लिली, तूं मागच्या जन्मीं माझी आई होतीस का ग!" वाफेनं उफाळून आलेल पाणी घेऊन खोलींत येणाऱ्या लीलेला त्यानं विचारलं.

" काहींतरीच नका बोलूं."

साबणाचा फेस गालावर चढवीत तो म्हणाला, " लीले, अग तिथं दोनतीन दिवस दाढी करत नाहीं मी-'

" चला-"

" अग खरच, वेळच नाहीं मुळीं मिळत-"

" म्हणजे करता तरी काय?"

" काय करतों!" त्यानं माग वळून खुर्चीमागं उभ्या असलेल्या लीलेकडे पाहिलं-

" मग सांगतों. नाहींतर कापेल ना गाल-"

तो नाजुक हातान दाढी करूं लागला.

समोरच्या आरशात त्याचं प्रतिबिंब तिला दिसत होतं. या दोन माहिन्यांत त्याचा चेहरा अधिक तेजस्वी दिसू लागला आहे हें तिच्या लक्षांत आल्यावाचून राहिल नाहीं

" तुम्हाला मानवली बरं का बोर्डींची हवा ! " त्याच्या केसांवरून हात फिरवीत ती कौतुकानं म्हणाली.

" तुम्हाला असंच वाटायचं आणि तूं मात्र विरहानं अगदीं कृश झाली आहेस नाहीं-तिथं आमचे हाल कुत्रा खात नाहीं-आणि तुम्हीं म्हणावं -बरे गलेलठ्ठ झाला आहात ! "

हसूं आवरून त्याच्या प्रतिबिंबावर नजर रोखीत ती म्हणाली-

" का हो, तुमच्या कॉलेजात मुली पण आहेत ना ? "

" हो "-

" कशा काय आहेत ?"-

" पाहिल्यात कुठल्या लेकान ! "

" म्हणजे ?-"

" अशी मारक्या म्हशींसारखी बघूं नकी. अग, तूं डोळे बांधून टाकले आहेस ना माझे-मग पाहणार काय मी ! "

" इश्श ! "

" हाल कसले होतात हो तुमचे ? पत्रांत तर लिहीत होता-दिवस फार मजेंत जातात म्हणून-"

" सांगूं तुला काय काय करावं लागतं ते ? " तिला आपल्यासमोर ओढून घेऊन बोटं मोजायला सुरवात केली " बघ भाडीं घासतों, भोजनघर धुतों, आगण झाडतों-मोऱ्या धुतों-गांवचे रस्तेदेखील झाडतों कधींकधीं—"

" म्हणजे ! " तिचा चेहरा एकदम उतरल्यासारखा झाला. " मला कांहींच कळवलं नव्हतं तुम्हीं-असं फसवायचं आपल्या माणसाला ! " तिच्या नेत्रातून गालांवर आसवं ओघळलींसुद्धा.

" वेडी रे वेडी, अग हें आमचं एक प्रकारचं शिक्षणच आहे-

अगदींच कशी ग तूं " त्यानं उठून तिच्या गालावरील अश्रु टिपले, " येवढ्यासाठींच मीं कांहीं लिहिलं नाहीं तुला-मग उगीचच काळजी करीत बसली असतीस-" त्यानं तिला हळुवारपणें जवळ घेतलं

" किती त्रास होतो तुम्हाला-मला काहीच कल्पना नव्हती." तिनं डोळे पुसले

" हे घ्या पेन आणि हा घ्या कागद लिहा पाहू यावर-"

" काय ? "

" कीं मी परत येऊं शकत नाहीं. माझी बायको भयंकर आजारी आहे ! " ती गंभीरपणानं सागत होती.

" शाब्बास ! " त्यानं एकदम तिच्या पाठींत धपाटा दिला. " म्हणजे-नोकरी सोडून घरींच बैस म्हणून सागतेस तूं "-

" खरंच, मला नाहीं आवडत हें असल, मला वाटतं तुम्हाला अगदी कांहीं त्रास होऊं नये-कांहीं करायला लागू नये-तुम्हीं अगदीं नेहमीं सुखांत सुखांत असावं-" त्याच्या खाद्यावर मान टेकून ती हळूहळू बोलत होती.

तिच्या मस्तकावर नाजूकपणें हात फिरवीत तो म्हणाला—

" लीले, मलाहि असंच वाटतं-तुला किती कष्ट घ्यावे लागतात माझ्यासाठीं-तुला अगदीं फुलासारखं ठेवावं असं वाटतं मला-म्हणूनच या कष्टाच मला काहीं वाटत नाहीं..."

" खरंच गडे, आणखी किती दिवस असं दूरदूर राहायचं आपण ! "

" अग, आत्तां नाहीं का आलों ? पुनः दीडदोन महिन्यानं आहेच दिवाळीची सुटी महिनाभर-"

" पण आतां चारच दिवस—"

" हो, चारच-" त्याचा आवाज इतका जड आला !

आणि तो घरून परतला तोहि तितक्याच जड मनानं ! स्टेशन-वरून गाडी हालतांच त्याचं लीलाच्या तांबड्यालाल डोळ्याकडे लक्ष गेलं.

" खरंच, आलों नसतों तर बरं झालं असतं." असं वाटून त्याला पश्चात्ताप झाला त्या दिवशीं. त्यानं लीलाला सांगितलं होतं–' तुला सुखांत ठेवावंसं वाटतं.' खरंच का सुखात ठेवत होता तो! त्यानं एम्. ए. व्हावं, प्रोफेसर व्हावं अशी तिची फार हौस. पण त्याचा कुठ त्यानं विचार केला होता! तिला कॉलेजमधें शिकायचं होतं. निदान एक वर्ष तरी कॉलेजच्या वातावरणांत काढावं अशी तिची जबर इच्छा होती. पण आईच्या इच्छेनुसार त्यानं तिकडे दुर्लक्षच केलं होतं.

" करायचं काय तुला शिकून ?" अशा तऱ्हेनं त्या भोळ्या पोरीची त्यानं समजूत काढली होती. पांच वारी पातळं नेसण्याची तिची साधी इच्छा! लग्नापूर्वी ती पाच वारीच नेसत असे. पण याच्या घरात आल्यावर तिला नऊवारी साड्याच नेसाव्या लागल्या ती खूप कुरकुरली. पण त्यानं एकाच वाक्यांत तिला गप्प बसवलं. " आईच्या मनाविरुद्ध मला वागता यायचं नाहीं लीला!" आणि मग तिनं त्याबाबत आता-पर्यंत एक शब्द काढला नव्हता. आपली आई तिच्याशीं जरा तुसडे-पणानं वागते हें त्याच्या लक्षात आलं होतं. पण त्याबाबत का कुणास ठाऊक एका शब्दानं तो तिला सहानुभूति दर्शवीत नव्हता. कधीं तिनं तक्रार केली तर तो म्हणे, " आपण लक्ष देऊं नये तिच्या बोलण्याकडे." आणि इतके सारे अपराध असूनहि ती किती गोडीनं, जिव्हाळ्यानं त्याच्याशीं वागत होती! हें सगळं त्याला आठवलं आणि त्याचं मन अस्वस्थ झालं. त्याची गाडी त्याला जितक्या वेगानं पुढं नेत होती, तितक्याच वेगानं त्याचं मन मागील गोष्टींचा आढावा घेऊं पाहात होतं.

तो बोर्डीला येऊन शिक्षणक्रमात गुंतला तरी त्याच्या मनाची व्यग्रता जाऊं पाहात नव्हती. कशातच त्याचं मन लागेनासं होत होतं. आत्म-निरीक्षण हें पुष्कळदा फायद्याचं असलं तरी काहीं बाबतींत त्यामुळं आत्मगौरवाची भावना दुखावली जाते आणि तो मनस्ताप असह्य होतो. तसंच केशवचं झालं.

त्यांतच भर म्हणून कीं काय आतांशा लीलेचीं पत्रंहि अगदीं त्रोटक येऊं लागलीं. कधीं कधीं तर दोन दोन दिवस मधें पत्राशिवाय जाऊं

लागले. त्याच्याहि पत्रांत चिडखोरपणा येऊं लागला. पत्र आलं नाहीं कीं तो लीलेवर भयंकर रागवे. " चांगली हजेरी घेतली पाहिजे लिलीची ! " असाच तो मनांत ठाम निश्चय करी. आणि मनाला वाटेल तशीं पत्रं लिही. मग तिचं पत्र आजिबातच चारसहा दिवस येत नसे अशी कांहीं त्याच्या मनाची घडी विसकटत चालली होती !

सुट्टीत घरीं जाताना लीलेला तिच्या अशा बेपर्वा वागण्याचा जाब विचारायचा असा निश्चयच त्यानं करून ठेवला होता

त्यानं घरांत पाऊल टाकलं तेव्हा लीला स्वयंपाकघरांत सासूला कांहीं मदत करीत होती. दोघांची नजरानजर झाली पण मागच्या-सारखा ओसंडणारा आनंद तिच्या चेहऱ्यावर त्याला दिसला नाहीं. तिनं नाजुक स्मित करीत आपल्या काळ्याभोर विशाल डोळ्यांनीं एकदां ओझरतं त्याच्याकडे पाहिल आणि चटकन् नजर वळवली. " झालंय तरी काय या कार्टीला ! " तो मनातल्या मनात चिडल्या-सारखा झाला. जेवणातहि त्याचं नीटसं लक्ष नव्हतं.

ती आपलं काम आटपून खोलींत आली, तेव्हां तो कांहीं वाचत बसला होता. त्याच्या गळ्यात हात टाकीत एकदम ती म्हणाली, " कां, आज बरं नाही का वाटतं ? जाग्रण झालं का प्रवासात ? "

" तुला काय करायचं आहे त्याच्याशीं " त्यानं तिचे हात दूर केले.

" म्हणजे ! मीं काय केलं म्हणून रागावता माझ्यावर ? " ती त्याला अधिकच बिलगली

" पत्राच्या बाबतींत किती बेपर्वापणानें वागलीस ? माझा छळ चालवला होतास आणि म्हणतेस मीं काय केलं ? माझ्याविषयीं तुला मुळींच आस्था वाटत नाहीं. "

" तसं नाहीं हो, " तिच्या आवाजांतील मृदुभावानं त्याचं हृदय थरारून गेलं. " आणि तुम्ही तरी किती रागरागानं पत्रं लिहीत होतां ? माणूस गरीब दिसलं कीं त्याला वाटेल तसं बोलून घ्यावं नाहीं ? खरंच, मला इतकी भीति वाटते तुमची ! "

" असं म्हटल म्हणजे झालं ! तुला माझ्या मनाची कल्पनाच नाहीं. माझा जीव इतका तुटतो तुझ्यासांठीं आणि तूं अशी बेफिकिरीनं –"

" पुरे पुरे, आता माझं चुकलं म्हणते ना ! " तिनं त्याच्या कुशींत मुख लपवलं. आलेले मेघ विरून गेले आणि पुन: कोंवळं ऊन पडल

" लीले, लीले, रडतेस की काय ? " त्यानं तिचे खादे जोरानं हालवले

" नाहीं "

" मग हें काय ? इकडे बघ बघूं—"

" अंहं. मला किनई असंच जन्मभर राहावं सारखं वाटतं मला फार भीति वाटते हो. "

" वेडी ! " तो हळूहळू तिचं मस्तक थोपटूं लागला.

खरंच ती वेडेपणानं वागली होती त्याच्याबरोबर या वेडेपणाचं कारण जेव्हा त्याला कळलं तेव्हा त्याचं मन भरून आलं. किती दुष्ट-पणानं आपण तिच्याबरोबर वागलों याचें त्याला वाईट वाटलं आतां लीला भेटली कीं तिची क्षमा मागायची असं त्यानं त्या क्षणीं ठरवून टाकलं.

त्या दिवशीं ती खोलींत आली त्या वेळीं तो तिची वाटच पाहात होता

" काय लीलाबाई, आमच्यापासून लपवून ठवूं पाहात होता नाहीं का ? " त्यानं प्रेमभरात तिचे दोन्ही हात हातात घेतले.

त्याची भेदक नजर तिला असह्य झाली. " काय काय, पण सागा ना ? " इतकं बोलतानाच ती इतकी अडखळली.

लीलाचे किती लाड करावे अन् किती करूं नयेत असं त्याला होऊन गेलं होतं. तिचीं भराभर चुंबनं घेत तो म्हणाला, " आईनं सागितलं मला, लबाड. "

" अशा आहेत सासूबाई—" त्याच्या हातातून आपल्याला तिनं सोडवून घेतलं—

" आणि सूनबाई कशा आहेत ? " तिच्याकडे पाहात त्यानं सिगारेट काढली.

" थाबा हं. " तिनं चटकन् काडी ओढून त्याच्या ओठातील सिगारेट शिलगावली.

" अरे ! अरे ! आज हे काय आणि नवीन ! आम्हाला एवढंदेखील काम करूं द्यायचं नाहीं वाटतं. "

" अंहं. किती थकून आलां आहांत. आतां अगदीं राजासारखं राहायचं; खरंच, आता नाहीं गेलं तर नाहीं का चालणार ? "

" हें बघ, आता यापुढं ब्रह्मदेवानं जरी हुकूम दिला तरी तुला सोडून मी जाणार नाहीं. आता काय पांचच महिने उरले--"

" हो पण-मला वाटतं सारखं तुमच्याजवळ असावं-तुम्ही नसलांत कीं भय वाटू लागतं--हल्लीं तर फार वाटतं." बोलताबोलतां ती एकदम गंभीर झाली

" खुळी-आई आहे. तिला सांगावं आपल्याला कांहीं कमजास्त वाटत असलं तर--"

" मला कुणालाच काहीं सागतां येत नाहीं. पण तुम्ही राहा ना. नाहींतर मी येतें तुमच्याबरोबर."

तिच्या बोलण्यांतील व्याकुळता त्याला जाणवली. तो स्तब्ध राहिला.

" अस काय बोलावं--" काहींतरी बोलायचं म्हणून तो बोलला.

तो इथं आणखी पंधरावीसच दिवस राहिला, पण तेवढ्यांत त्याला लीलाच्या वागण्यातील फरक दिसून आला. एखाद्या लहान मुलासारखी ती त्याच्या सारखा जवळजवळ राहण्याचा प्रयत्न करी. दोघंच बसलीं कीं त्याच्याकडे कितीतरी वेळ टक लावून तिनं पाहात राहावं आणि पाहतांपाहता तिचे डोळे भरून यावे.

" का ग ? काय झालं ? " असं काहीं त्यान विचारताच " कां कसल-उगीच " अस म्हणत तिनं नाजूक हसावं. " तुम्ही नका जाऊ, मला फार भीति वाटते हो. " हें तर तिचं नेहमींच चाललेलं असे.

सुट्टी संपली तशी तिला सोडून जाणं त्याच्या जिवावर आलं. पण

असं थोडंच व्यवहारात वागून चालत ? तो ज्या दिवशीं जाणार होता त्या दिवशीं तिचे डोळे सारखे भरून येत होते. " फार त्रास घेऊं नका–" असं घडोघडीं ती त्याला बजावीत होती या वेळीं ती त्याला पोचवायला गेली नाहीं. दारातूनच तिनं त्याला निरोप दिला टांगा हालताच आपल्या अंतःकरणाचा लचकाच तोडल्यासारख्या त्याला वेदना झाल्या. त्याचा भाऊ त्याच्याबरोबर आला होता; त्यानंच केशवचं तिकीट काढलं. गाडी स्टेशनवर येताच केशव यंत्राप्रमाणं गाडींत जाऊन खिडकीशीं बसला. फलाटावर जी धांवपळ चालली होती ती त्याला दिसत नव्हती. त्याचा भाऊ आपल्या कॉलेजमधील कांहीं गोष्टी सागत होता तें त्याला ऐकूं येत नव्हतं. लीलाच्या आसवानीं भरून आलेल्या संथ विशाल डोळ्यानीं त्याचं मन व्यापून टाकलं होतं. "मला सारखं तुमच्याजवळ राहावंस वाटतं–तुम्ही नसलात तर भीति वाटते–" तिचे शब्द सारखे त्याच्या कानात घुमत होते.

गार्डानं कर्कश शिट्टी दिली तेव्हा तो भानावर आला. गाडी हालली तरी त्याचा भाऊ फळीवर उभा होता

" भाऊ, आईला म्हणावं लीलाला नीट संभाळ " इतकंच तो भावाशीं बोलला–" आणि तूंहि जरा लक्ष देत जा तिच्याकडे–"

" बरं बरं " म्हणत भावानं फलाटावर उडी घेतली.

रूक्ष अतःकरणानं केशव खिडकीबाहेर मान काढून पाहात होता. तो काय पाहात होता तें त्याचं त्याला तरी कुठं कळत होत ?



## ते अश्रु !   : ४

सकाळीं दहाचा सुमार असेल. सुतारकामाच्या वर्गाच्या बाहेरच्या व्हराड्यांत टेबलाशीं उभा राहून केशव जोराजोरानं रंधा मारीत होता. पण आज त्याचं कामाकडे लक्षच नव्हतं नेहमीं याचं काम रेखीव आणि सुबक होत असे. पण आज काय झालं होतं कुणाला ठाऊक; रंधा मारतांनादेखील तो चुकत होता निळं एप्रेन घातलेल्या प्राध्यापकांनीं दोनतीनदा त्याच्या टेबलाशीं येऊन त्याच्याकडे मिस्किलपणें पाहिलं. " केशवराव, राहूं दे आज काम. आज दुसरं काहीं घ्या. " असं सुनावलंदेखील.

केशवनं कपाळावरचा घाम पुसला, टेबलावरील हत्यारं इकडचीं तिकडे केलीं; आणि समोर क्षितिजापर्यंत पोंचलेल्या अफाट समुद्राकडे तो किलकिले डोळे करून पाहात राहिला. क्षणोक्षणीं रंग बदलणारं तें समुद्राचं पाणी आज अगदीं तांबडं गढूळ दिसत होतं. रेशमाच्या पांढऱ्या लडी वहात याव्यात तशा लाटा हळूहळू किनाऱ्याकडे येत होत्या. क्षितिजाकडे पांचसहा शिडाचीं जहाजं उभीं होतीं. राज हें दृश्य कितीदा पाहिलं तरी त्याला पुरें वाटायचं नाहीं. पण तिथंहि त्याचं मन लागेना. मार्च महिन्यांतील या उन्हाच्या झळी, कामाचं दडपण आणि मनसंताप यांनीं तो अगदीं हैराण होऊन गेला होता. मनसंताप होण्याला तसंच कारण घडून आलं होतं.

आज चार दिवस झाले, लीलेचं पत्र नव्हतं. आजहि त्यानं मोठ्या उत्कंठेनं वाट पाहिली होती, पण तें खुणेचं निळं पाकीट टपालांत त्याला दिसलं नव्हतं आणि त्याच्या मनाचा तोल गेल्यासारखा झाला

होता तिचे दिवस भरत आले होते. गेल्याच पत्रात तिनं लिहिलं होतं– " डॉक्टर म्हणतात, फार तर आठ दिवस जातील " आणि त्यानंतर तिचं पत्र नव्हतं. त्याला तिच्यावर खूप रागवावंसं वाटत होतं, पण तो रागावूंहि शकत नव्हता अशा कांहीं विचित्र मन-स्थितींत सापडला होता तो त्याची एक सहाध्यायिनी त्याच्याजवळ येऊन उभी राहिली तरी त्याचं लक्ष गेलं नाहीं.

" काय केशवराव, 'सुतार उत्तमसा तुजसाठीं मीं आणविला, पाळणा रंगीत बनविला.' किती छान काव्य आहे नाहीं? तिकडेच ध्यान लागलेलं दिसतय–" तिनं हसत हसत म्हटलं.

नेहमीच्या लहरींत असता तर त्यानं तिला आणखी काहीं बोलून चागलाच विनोद निर्माण केला असता.

"लिलीचं पत्र नाहीं आल आज " इतकंच म्हणून त्यानं टेबलावरील भुसा झाडल्यासारख केल.

" मग तुम्ही जाऊन का नाहीं येत? रजा घ्या आठदहा दिवसाची आणि जा ना तुम्ही पुरुष तरी भारीच निर्दय तुम्हाला राहावतं तरी कसं इथं–तिथं ती एकटी–"

" का? माझी आई–"

" पुरे पुरे. अशा वेळीं ज्याचं माणूस त्याच्याजवळ असलं म्हणजे बरं. धीर येतो मनाला–"

स्त्री मग ती शिकलेली असो किंवा नसो, काहीं बाबतींत किती सारखं असत तिचं मन–केशवला वाटून गेलं. गेल्या दिवाळीच्या सुट्टींतील त्याला आठवण झाली. लिली त्या वेळीं त्याच्या मागं लागली होती. " मला भीति वाटते हो! तुम्ही राहा ना इथंच. " तो टांग्यांत बसून निघाला त्या वेळचे ते तिचे असहाय डोळे–

" खरंच जाऊन यावं म्हणतो. " तो आपल्याशींच पुटपुटला.

" आतां कसं छान बोललात–"

आणि मग अकरा वाजेपर्यंत कसेंतरी काम संपवून तो खोलीवर आला. तो दुपारच्या गाडीला जायचा बेत ठरवूनच. खरं तर त्याला जायला

पाहिजे होतं. त्याच्या लीलासाठीं त्याला जागं जरूर होतं. लीलाची ती कृश भारावलेली, अवघडलेली मूर्ति सारखी त्याचं मन अस्वस्थ करून टाकत होती. गाडीच्या धावत्या वेगाबरोबरच त्याच मन भूतकाळात धावत होतं.

दिवाळीच्या सुट्टीनंतर तो लीलाचा निरोप घेऊन कॉलेजला आला पण येते वेळीं लीलाविषयी किती वेगळ्या भावना मनात घेऊन आला होता ! आजपर्यंत लीला त्याची होती; पण तो तिला आपल्याहून श्रेष्ठ मानण्यास तयार नव्हता आपणाला जिच्याविषयीं जिव्हाळा वाटतो अशी एक देखणी चतुर लहान पोरगी. आपण हसलों कीं ती हंसणार, आपण रागावलो कीं ती कोमेजणार; आपण वागवूं तसं ती वागणार. आपण तिचे लाड करायचे आणि तिनं त्यांत धन्य मानून घ्यायचं अशीच काहींशी त्याची तिच्याविषयीं भावना होती. पण आता असं राहिलं नाहीं. " लीला माझी आहे " या शब्दामागं केवढा तरी मोठा अर्थ आहे याची त्याला जाणीव झाली होती. लीला आपल्या बरोबरीची आहे इतकंच नव्हे, तर ती आपणाहून श्रेष्ठ आहे हीहि त्याला जाणीव झाली होती. ती जे काहीं त्याच्यासाठीं सहन करत होती, ती जें काहीं त्याला देणार होती त्याच्या जाणिवेनं त्याचं मन तिच्याविषयीं कृतज्ञतेन तुडुंब भरल्यासारखं होऊन गेलं होत. दिवाळीनंतर आतापर्यंत त्यानं तीनचारदा घरीं खेप घातली होती. आणि प्रत्येक खेपेला लीलाचं तें वेगळं दिसणारं व्यक्तित्व त्याला जीवनाच्या दिव्य साक्षात्काराचा अनुभव आणून देत होतं.

दिवाळीनंतर तो पहिल्यांदाच घरीं निघाला; तेव्हाचा प्रसंग त्याला आठवला लीलाला भेटण्यासाठींच तो घरीं निघाला होता. तिचं नुकतंच आलेलं पत्र किती वाचलं तरी त्याला पुरें वाटत नव्हतं आणि शेवटच्या वाक्यावर तो सारखा अडखळत होता. तिनं लिहिलं होतं–

" आणखी एक गोष्ट मला तुम्हाला सांगावयाची आहे. पण कशी सांगूं ? कसं लिहावं तेंच मुळीं समजत नाहीं. खरं सांगूं का, लिहायची लाज वाटते, पण तुम्ही या ना–"

" नाहींतरी बायकाना दुसऱ्याला कोड्यांत टाकण्याची भारीच खोड ! " असं पुटपुटत सतरांदा त्यानं त्या पत्राची घडी केली होती आणि खिशांत घातली होती.

आणि घरांत शिरताच माजघराच्या दाराशीं उभ्या असलेल्या लीलाला पाहून तर त्याला आश्चर्याचा धक्काच बसला होता. डोळ्यांभोंवतालचीं तीं काळीं वर्तुळं, ते बसलेले गाल, ती उंच निघालेली मान आणि तो तिचा कृशपणा-जें काहीं चादण्याचं तेज साठलं होतं तें तिच्या काळ्यो· भोर डोळ्यात. तिच्या बांध्याला जो एक मस्त ताठा आला होता-आणि ज्यावर केशव अगदी बेहद्द खूष होता-तो तर कुठच्या कुठं नाहींसा झाला होता माझी लीला ती हीच काय असाच त्याला सम्भ्रम झाला. ती त्याच्याशीं बोलली तेव्हा त्याचं अंर्तमन दचकलंच. हा लीलाचा आवाज नव्हता - त्या आवाजात खोडकरपणा नव्हता. उसन्या रागाची छटा नव्हती. ताठरपणा नव्हता—

तो स्वयंपाकघरात गप्पा मारत बसला तेव्हा त्याची आई त्याला म्हणाली होती,

" कधीं का कोणाला डोहाळे लागत नाहींत-पण तुझी बायको बाबा भारी विलक्षण-कधीं मनमोकळं बोलायची नाहीं कीं हवं नको सांगायची नाहीं. "

त्या दिवशीं केशव तिच्या वाट्याला आलाच नाहीं. सर्व दुपारभर त्याच्या आईशीं गप्पा चालल्या होत्या. सर्व संध्याकाळ मित्राच्या कोंडाळ्यात त्यानं घालवली होती.

" आल्यापासून या क्षणाची वाट पाहातों आहें मी लीले, " म्हणून रात्रीं त्यानं तिला जवळ घेऊन म्हणताच ती रागावली. पण तो राग क्षणाचाच. कारण किती दिवसानीं केशव तिला भेटला होता.

" लीले, किती वाळलीस, किती बदललीस ? "

त्यानं विचारलेल्या प्रश्नावर ती नुसती हसली होती.

" मी तुम्हाला गंमत देणार आहे. बघा तरी " असं लाडिकपणानं म्हणत तिनं आपली बॅग उघडली आणि त्यांतून कांहीं वस्तु काढून

त्याच्या अंगावर फेकल्या. त्यात त्याच्यासाठीं विणलेले दोन स्वेटर होते. त्याच्या उशाचे सुंदर भरतकाम केलेले अभ्रे होते, एक नवीन नमुन्याचं टेबलक्लॉथ होतं, दोन पायमोजाचे जोड होते आणि हें सर्व दाखवताना तिची सारखी बडबड चालली होती. लोकरीचे रंग कसे निवडले, एक-रंगी लोकर मिळवायला किती त्रास पडला, किती हेलपाटे घालावे लागले, अमुक नमुना कोणत्या इंग्रजी मासिकातून उतरून घेतला, आणि प्रत्येक खेपेला ' आवडेल ना तुम्हाला ? ' हें पालुपद काहीं सुटत नव्हतं. आणि आपलं सारं सागून संपल्यावर तिची प्रश्नाची सरबत्ती सुरू झाली.

" तुमच्या बोर्डीला ही भाजी मिळते का ? तुम्ही रोज दूध घेत होता कीं नाहीं ? खोलीवर ऑम्लेट करत होता कीं नाहीं ? सुतार-कामात कोणत्या वस्तु तयार केल्यांत ? रोज फिरायला जाता कीं नाहीं ? तुमचे मित्र कोण ? मैत्रिणी कोण ? " केशव शक्य तीं उत्तरं देऊन शेवटीं म्हणाला,

" लीले, दुपारीं आई म्हणत होती, तूं बोलत नाहींस. खरं का ग ? "

" हं. मला वाटतच नाहीं बोलावंसं. " लीलेनं एकदम गंभीर होऊन उत्तर दिलं.

" हो का ? आणि मघापासून भाटासारखी तुझीच बडबड चाललीय कीं–"

" असे आहात अगदीं ! एवढ्यासाठीं विचारलं होय ? " म्हणत तिनं हातातल्या स्वेटरमधें तोंड लपवलं.

" मीं पण तुझ्यासाठीं गंमत आणली आहे, पाहिलीस का ? " म्हणत त्यानं टेबलाखालची छोटी करंडी काढली. बोर्डीहून त्यानं मोठमोठे गोड चिक्कू आणले होते. त्यानं एक काढून कापायला सुरवात केली.

" शी, शी, मला नको हं, मुळींच जाणार नाहीं. " तिनं नाकाला पदर लावून सांगितलं.

" पहातों ना कसा जात नाहीं तो " असं म्हणत तिच्या प्रति-काराला न जुमानता त्यानं एक फोड तिला खायला लावली. दुसरी तिच्या तोंडात अळेंबळें ढकलली. आणि सबंध चिक्कू संपताच हसत हसत तो म्हणाला–

" बाईसाहेब, आता कसं– ? "

" तें तुम्हालाच माहीत " तिनं ओशाळून सांगितलं

" केव्हापासून तुला विचारीन म्हणतों. हे सांग पाहूं काय तें अगोदर—" त्यानं उठून कोटाच्या वरच्याच खिशातील तिच्या पत्राची घडी काढली.

" काय तें ? " तिनं आपले मोठे डोळे अधिकच मोठे केले.

" हें हें " त्यानं तिच्या त्या पत्रांतील ओळींवरून बोट फिरवलं

" काहीं नाहीं–कांहीं नाहीं–" असं म्हणत इतक्या गडबडीनं तिनं त्याच्या हातातील पत्र काढून घेतल ! तिच्या लालबुंद पडलेल्या चेहऱ्या-कडे पाहात केशव म्हणाला,

" माझी लाज वाटते तुला लिली–"

" झोपा पाहूं आता. मला सकाळी लवकर उठायचं आहे " पलंगा-वर अंग लोटून तिनं तोंडावरून पांघरूणदेखील ओढलं

रात्रीं मधेंच त्याला जाग आली ती लीलाची हाक ऐकून.

" काय ग ? " त्यान आळसटल्या आवाजांत विचारलं.

"हें बघा तरी–" तिच्या आवाजांतील विलक्षण कोमल कातरता आणि तिच्या हाताची थरथर त्याच्या एकदम लक्षात आली. त्याची झोप एकदम उडून गेली. ज्या जीवनस्पर्शाचा साक्षात्कार तिनं त्याला करून दिला त्यानं त्याच्या मनात विजेचीं असंख्य फुलपाखरं उसळलीं. आपल्याला काय वाटतं आहे हें त्याच त्यालाच समजेना.

" लीले–" कसेबसे एवढे शब्द उच्चारून त्यानं तिच्या उटीपोटा-वर पुन्हा हलकेंच हात ठेवला. धारोष्ण दूध पिऊन मस्त झालेल्या वासरानं गाईच्या अंगाला ढुशा द्याव्यात, तसा त्या निराकार जिवाचा आंत खेळ चालला होता. त्याची उसळी केशवच्या हाताला स्पष्ट जाण-

वत होती. कसल्यातरी विचित्र भावनेनं त्याची कानशिलं तापून गेली. कसल्यातरी विलक्षण ओढीनं त्यानं त्या जागेचं आवेगानं चुंबन घेतलं. माझ्या लिलीला किती जवळ घेऊं आणि तिचं कसं कौतुक करूं असं त्याला होऊन गेलं

" काय दंगा हा !"–तिच्या आवाजातील कोमलपणानं तो भानावर आला.

"लीले, खरंच विसरलों मी." अगदीं केविलवाणेपणान तो म्हणाला, " त्रास झाला का तुला ? "

त्याच्या डोळ्यातील पाणी पाहून तिला चमत्कारिक वाटलं

" रागावलात ? "

" छे ग–चुकलो तूं आतां माझी एकट्याचीच नाहींस. "

" काहींतरी नका बोलूं ! "

उजाडलेला दिवस त्याचा फारच गडबडीचा गेला. सकाळीं लीलाला बरोबर घेऊन तो सूतिकागृहात गेला तिथं तिच्या प्रकृतीविषयीं त्यानं अगदीं खात्री करून घेतली. मग तिला टांग्यातून घरीं पाठवून तो आपल्या डॉक्टरकडे गेला तिथ जरा वेळ डॉक्टरशीं बोलून त्यानं औषधाची यादी त्याच्याकडून घेतली केमिस्टकडे जाऊन त्या गोळ्या, ती टॉनिकं खरेदी केलीं. मंडईतील ओळखीच्या फळवाल्याला रोज केळीं, मुसंबीं इत्यादि फळं घरपोंच करण्याची व्यवस्था करण्यास सांगितलं दुसरे दिवशीं सकाळींच त्याला निघायचं होतं जायच्या वेळेपर्यंत कोणतं औषध केव्हां अन् कसं घ्यायचं याचे तो तिला सारखे पाठ देत होता. प्रत्येकाचं महत्त्व तिला पटवून देत होता ती ' हो हो ' म्हणत होती त्याच्याकडे पाहात होती, आणि तिचे डोळे पाण्यानं भरून येत होते.

जातेवेळीं तिचा निरोप घेताना त्याला फार अवघड वाटलं त्याच्या डोळ्यात पाणी आलं. सगळं कांहीं लपवायला म्हणूनच कीं काय कुणाला उद्देशून कुणाला ठाऊक, तो दरडावून मोठ्यानं म्हणाला,

" बेट्या, आतां यापुढं आईला छळशील तर याद राख. माझ्याशीं गाठ आहे ! " आणि मोठ्यानं हसला.

" खरंच कमाल आहे बाई तुमच्यापुढें ! " डोळ्यात पाणी असूनहि लीलेला हसूं कोसळलं.

केशवनं दिलेली ही धमकी चागलीच लागूं पडली. कारण त्या-नंतरच्या खेपेला केशव घरीं आला तेव्हा लीला अगदीं पुन्हा आपल्या पहिल्या दिमाखात आली होती. तिचा बाधा पुन्हां रसरसला होता. त्याला गोलपणाहि आला होता. तिच्या गंभीरपणाचा रुबाब दृष्ट लागण्या-सारखा होता. त्याच्या आईनं मोठ्या हौसेनं सुनेचा वाडी भरण्याचा समारंभ केला. त्या वेळचं फुलमाळानीं सजलेल्या त्या भिल्लिणीचं रूप पाहून केशव आश्चर्यानं स्तिमित होऊन गेला होता.

त्यानं आल्याबरोबर औषधाचं कपाट उघडून पाहिलं. त्यानं आणून दिलेल्या बाटल्यांपैकीं एखादी संपली होती. एका बाटलींतील गोळ्या थोडयाशा कमी झाल्या होत्या. या खेपेला तो आठदहा दिवस राहाणार होता. रोज संध्याकाळ झाली कीं त्यानं म्हणावं,

" लीले, चल फिरायला— "

" नाहीं— मी नाहीं येणार. "

" अग चल. व्यायाम घ्यावा रोज— "

" मला माहीत आहे. पण मी फिरायला नाहीं येणार. आपण घरींच बोलत बसूं-- "

ती बाहेर येण्याचं कां टाळते हें त्याला कळत होतं. तो तिची समजूत घाली.

" लीले, तूं कांहीं वाईट दिसत नाहींस. उलट किती छान दिसतेस. अगदीं बेडौल दिसणाऱ्या बायकादेखील मातृदैवतं म्हणून कौतुकानं हिंडतात रस्त्यानं-मग-- "

" मला दुसऱ्याचं नका सागूं-- "

" बरं. आपण रात्रीं जाऊं दहा वाजतां-- "

आणि या त्याच्या आग्रहाला तिनं कबुली दिली होती.

त्या दिवशीं रात्रीं केशव तिला घेऊन फिरायला म्हणून बाहेर पडला. रस्त्यावर शुकशुकाट होता वरून आकाशाचं निळं छत पसरलं होतं, त्या पार्श्वभूमीवर घराघराच्या रेखा उठून दिसत होत्या. लीलाबरोबर त्याला हळू-फारच हळू-चालावं लागत होतं. मधूनमधून तिला आधारहि द्यावा लागत होता. आपल्या शिक्षणक्रमांतील गंमती सांगून तिला हसवीतहि होता. अशीच गोष्ट सांगण्याच्या तो रंगात आला होता. इतक्यांत ती त्याला एकदम बिलगली.

" चला परतूंया. " ती भयंकर घाबरली होती.

त्यानं दचकून समोर पाहिलं. जरा अंतरावरून आडव्या गेलेल्या रस्त्यानं एक गॅसबत्ती चालवली होती. मागें पांचसहा माणसं झपाझप चाललीं होतीं. सर्वांत पुढं असणाऱ्या व्यक्तीनं दोन्ही हातात पांढऱ्या फडक्यात गुंडाळलेलं कांहींतरी धरलं होतं.

तो परतला. वाटेंत कुणीच बोललं नाहीं.

" मला भीति वाटते हो ! " खोलींत येताच तिनं त्याला घट्ट धरलं.

" वेडी ! " तो शुष्कपणें हसला. पण त्याच्या मनांतहि कुठंतरी काटा बोचल्यासारखं झालं होतं.

आणि आज गाडींतून जात असताना हीच आठवण त्याच्या मनाला अस्वस्थ करून टाकत होती. लीला सुखरूप असेल ना, हाच घोर त्याच्या जिवाला लागला होता.

त्यानं दारांत पाऊल टाकलं तें जरा अस्वस्थ मनस्थितींतच. घरांत सारवलेल्या जमिनीवर रांगोळी घालत बसलेल्या लीलाला पाहतांच त्याचं मन फुलासारखं हलकं नि प्रसन्न झालं. त्याला पाहतांच ती उठली. तिला उठतांना होणारे कष्ट त्याच्या नजरेंतून सुटले नाहींत. ती त्याला फारच ओढल्यासारखी दिसली. चहा करण्यासाठीं तिनं स्टोव्ह काढला, तशी त्यानं बहिणीला हाक मारली.

" तूं नको दगदग करूं. ती करील चहा. "

तिच्या प्रत्येक हालचालींत ओझं असह्य झाल्याची जाणीव त्याला

दिसून येत होती. तरी ती घरांत वाकत होती, फिरत होती, झेपेल तें काम करत होती. त्याला आईचा, बहिणीचा राग आला. जेवतेवेळीं ती वाढायला आली तेव्हा मात्र त्याला असह्य झालं.

"आई, तिला कशाला वाढायला लावतेस–" तो रागांतच म्हणाला.

" अवघडलं म्हणून काय झालं ? बसून नाहीं हो उपयोगी. आणि तुला एवढं वाटत असेल तर बसेना बापडी. मीं थोडंच काम लावलंय तिला–" तिच्याकडे रोखून पाहात त्याची आई म्हणाली.

ती कांहींच बोलली नाहीं. तिनहि हातांतलं काम सोडलं नाहीं. दुपारीं ती खोलींत येतांच तो म्हणाला,

" आता विश्रांति घे पाहू किती कष्ट होतात तुला–"

" इश्श ! कष्ट कसले त्यात ? " ती गोड हसली

" काय म्हणतात डॉक्टर ! " त्यानं काळजीच्या सुरांत विचारलं.

" उद्या किंवा परवां–"

" खरंच ? "

" पण मला इतकी भीति वाटते–काहीं माहीत नाहीं–" ती त्याला बिलगून म्हणाली.

" वेडी–अशा गोष्टी का आधीं माहीत असतात ! आपोआपच सारं कांहीं छान होतं. घाबरायचं नाहीं. तेवढ्यासाठीं तर मी आलो. "

" मी तुमची इतकी वाट पाहात होते–"

" म्हणूनच आलों. "

" खरंच, किती चांगले आहां तुम्ही ! "

डॉक्टरनीं जरी दोन दिवसानीं मुदत दिली होती तरी ती त्या मध्यरात्रींच जागी झाली. तिच्या डाव्या माडींतून जी सणक निघाली ती कमरेंत किती वेळ तरी घुमत राहिली. ती चटकन् उठून बसली. असं का होतं हें तिला कळेना. आणि मग अशाच बारीकसारीक सणका येऊं लागल्या. पोट दुखणं म्हणतात ते हेंच काय ? कुणाला ठाऊक ! तिनं केशवला उठवलं. थोड्याच वेळांत सारं घर जागं झालं. दारासमोर टॅक्सी उभी राहिली.

" लीला, चल " त्यानं तिच्या खांद्यावर हात ठेवला.

" नको. "

" हें काय ? चल. " त्यानं हळूच तिला उठवलं.

तिनं आपला हुंदका त्याच्या कुशींत लपवला.

त्यानहि आपले डोळे पुसल्यासारखे केले.

किती अवघड वेळ !

सूतिकागृहाच्या बाहेरच्या हॉलमधें किती तरी वेळ तो बसून होता. लीला आत गेली होती. तिच्या मागून त्याची आई व बहीणहि गेली होती. आणि जवळजवळ तास होत आला. बाहेर त्याला काहींच कळलं नव्हतं ! लिलीला किती त्रास सोसावा लागणार कुणास ठाऊक, या विचारानं त्याचं मन पिळवटून निघत होतं. ' उगाच फंदात पडलों आपण,' म्हणून त्यानं स्वतःला दोन शिव्यासुद्धा देऊन घेतल्या ! या पश्चात्तापाच्या मनःस्थितींत तो असताना एक नर्स येऊन त्याला म्हणाली,

" तुम्ही काहीं काळजी करू नका सारं काहीं ठीक आहे. सकाळीं या. त्या काहीं सहाच्या आंत बाळंत होत नाहींत "

" पण मला डॉक्टराना भेटायचं होतं– "

" त्या बंगल्यावर गेल्या आहेत. सकाळीं येतील. "

" पण त्याना बोलावूं शकता–"

त्याच्या या अधिऱ्या काळजीचं नर्सला कौतुक वाटणं शक्य नव्हतं.

" तसं काहीं कारण नाहीं. तुम्ही काहीं घाबरूं नका. "

" मी आपली पहाटेच येईन " म्हणून त्याची आईहि निघाली.

लीला दाराशीं उभी होती. त्याचे पाय तिकडे ओढत होते. लीलाला सोडून जायचं त्याला अतिशय अवघड वाटलं.

" खरंच जाऊं मी ? " तो तिच्याजवळ गेला

" हं. जा. लौकर या मात्र. "

" भिऊं नको. "

" छे ! " तिनं हसत सांगितलं.

तिच्या अंगातलं तें धैर्य कुठून आलं अचानक ? तो स्तिमित झाला.

सारी रात्र त्याला झोप लागणं शक्य होतं काय ?

सकाळीं सहा वाजताच चहाचीदेखील वाट न पाहतां त्यानं कपडे केले नि सायकल बाहेर काढली.

डॉक्टर दाराशींच उभ्या होत्या.

" या या. आतांच तुमची केस संपवली. छोकरा झालाय् तुम्हांला ! जा आंत, पण त्यांना बोलण्याची तकलीफ नका देऊं. "

तो खोलींत आला तेव्हा ती कॉटवर डोळे मिटून पडली होती. बाजूचा पाळणा रिकामा होता. पण त्यात अंथरुण वगैरे जय्यत तयार होतं. जंतुनाशक द्रव्याचा दर्प खोलींत भरून राहिला होता.

त्यानं हलकेंच तिच्या कपाळावरून हात फिरविला. " लीला ! " त्याचा आवाज दाटल्यासारखा झाला.

त्याच्या स्पर्शासरशी तिन डोळे उघडले. तिचे डोळे कमालीचे निस्तेज झाले होते. पण त्यात एक नवीनच पाणी खेळत होतं.

" आलांत ? "

" हो. तुलां त्रास नाहीं ना झाला ? आता बरं वाटतं ना– "

ती हसली.

" बाळ पाहिलांत ? स्वारी आंघोळीला गेली आहे. "

" पाहूं मग. लीले–माझ्याकडे बघ " तो असं का म्हणाला कुणास ठाऊक.

त्याच्या डोळ्यांतून दोन टपोरे थेंब तिच्या ओठावर पडले. ते अश्रु आनंदाचे होते कीं कृतज्ञतेचे होते हें सांगणं मोठं कठिण होतं.



# पीर आणि पादुका! : ५

घाटावरून सेकंड गियरमध्यें सॉं सॉं करीत मोटर बेळगांव–कोल्हापूर रस्त्यावरून जाऊं लागली कीं, मोटरमधल्या प्रवाशाचं लक्ष आजू-बाजूच्या शेतवाडीकडे गेल्याशिवाय रहात नसे. तें काळंभोर रान कुणाच्याहि मनाला मोह पाडी. पिकाच्या दिवसांत हिरव्या लक्ष्मीचं सौंदर्य ओसंडून यायचं आणि येणाऱ्या-जाणाऱ्यांचीं मनं आपल्याकडे ओढून घ्यायचं. उन्हाळ्यांतील त्या जमिनीची शोभा तरी काय कमी? नांगरून नांगरून डिखळ्यानं भरलेली ती काळीभोर जमीन निळ्या-भोर आकाशाखालीं एक निराळंच सौंदर्य धारण करी. पण मोटरमधील प्रवासी डोकं बाहेर काढून पाहात आणि आश्चर्यानं स्तिमित होत, तें मात्र केवळ या धरित्रीच्या लावण्यानंच नव्हे.

शेतापलीकडे जें एक छोटंसं दगडी बांधकाम दिसे तिकडेच सर्वांचे डोळे लागत आणि " अरे " असे उद्गार नवख्याच्या तोंडून बाहेर पडल्याखेरीज रहात नसत. त्या बांधकामांत प्रेक्षणीय असं कांहींच नव्हतं. पण लोकांना आश्चर्य वाटे तें निराळयाच कारणानं.

त्या बांधकामाचे दोन भाग होते. एक भाग होता तें थडगं होतं. आणि त्याच्याचजवळ समोर एका हाताच्या अंतरावर एक समाधि होती आणि तीवर पादुका होत्या. थडग्यावर फुलाच्या वाळलेल्या माळा दिसत. समाधीवरहि फुलं पडलेलीं असत. एक छोटी तेलकट काळी पणतीहि तिथं चौथऱ्यावर पडलेली दिसून येई.

आणि हें पाहूनच लोकांना आश्चर्य वाटे, आणि ते याच विषयावर बोलणं सुरू करीत. मोटरीच्या ड्रायव्हरला दिवसांतून एकदां तरी

त्या बाधकामामागील इतिहास कुणाला तरी सागावा लागे. ज्या गावाच्या हद्दींत ते बाधकाम होतं त्या गांवातील लोकांनीं या इतिहासाला अगदीं कहाणीच स्वरूप देऊन टाकलं होतं. पाहुण्याचा आदर-सत्कार करण्यांत हे बाधकाम त्याला दाखवणं आणि त्याची कहाणी सांगणं हा एक जरुरीचा भाग होऊन बसला होता.

केव्हा आणि काय निमित्तानं कोणास ठाऊक, त्या खेड्यात चार मुसलमान कुटुंबानीं वस्ती केली होती या कथानकाच्या सुरुवातीचे वेळीं तर त्याच्यांतील व गावकऱ्यातील परकेपणा पूर्ण नाहींसा झाला होता. सुताराच्या आळीच्या पलीकडे जी थोडी गावठाणाची जागा होती तिथं त्या कुटुंबानीं मातीचीं का होईना पण आपापलीं घरं उभीं केलीं होतीं. गावातील शेतीहि तींच करीत वर्षाकाठीं एकदा गावांतील भाडीं गोळा करून त्याना डाक कल्हई देण्याचेंहि काम त्याच्याकडे असे. दसऱ्याच्या शिलंगणात आणि बेंदराच्या पोळ्याच्या भिरवणुकींत हीं कुटुंबं जितक्या उत्साहानं भाग घेत, तितक्याच उत्साहानं गावकरी मोहरमात ताबूत तयार करण्यात आणि करबलं नाचवण्यात भाग घेत.

त्या तीन चार कुटुबांतील एक त्यातल्या त्यात सधन होतं. रजाक हा शेतीच्या भानगडींत न पडतां तिथल्याच जवळपासच्या बस–लाईनवर ड्रायव्हर म्हणून काम करी त्याच्या घरीं माणसंहि थोडीं होतीं. तो, त्याची बायको, म्हातारी आई, आणि त्याची तरुण बालविधवा बहीण अमीर.

खानदानी मुसलमानात जें सौंदर्य दृष्टीस पडतं, ते या अमीरच्या वाटयाला आलं होतं. काळ्याभोर लाब पापण्यानीं युक्त असे धुंद डोळे, ताबूस गौरवर्ण, लाब सडक केस अशा तऱ्हेचं सौंदर्य देवानं तिला बहाल केलं होतं. आपल्या जातवाल्यापेक्षां तिनं आपली राहणीहि खूपच नीटनेटकी ठेवली होती. तिची ओढणी नेहमीं उंची असे. पाढरपेशा स्त्रीप्रमाणें दररोज ती आपले केस विंचरून वेणी घाली व वेणीच्या टोंकाला रुप्याचीं टोपणं असलेले गोंडे लावी. रुप्याच्य:

वाळ्याबरोबरच तिच्या हातात असलेल्या कांचेच्या बांगड्याहि उंची असत. नाकातील बुलाकाचा मोती तर आपल्या पाणीदारपणानं तिच्या चेहऱ्याचं सौंदर्य अधिकच वाढवी. आपल्या मुसलमानी भाषेंत किंवा हिंदीमिश्रित मराठी भाषेंत ती लाडिकपणानं बोलूं लागली कीं, ऐकणाराचं लक्ष तिच्या बोलण्यापेक्षां चेहऱ्याकडेच अधिक लागून राही.

तिच्या एकंदर ठाकठीकपणामुळेंच कीं काय गावात तिच्याविषयीं बरं बोलत नसत. गांवातील बायका शिवीशिवाय तिचं नाव घेत नसत तर नेहमीं गांवातील तीन चार तरुण तिच्या घरासमोरच्या माच्यावर बसलेले असत. अमीरला पानाचा भारी षोक गप्पा मारण्यासाठीं जो येईल त्याच्या चंचींतील पान तिला हमखास मिळे. तिनं स्वतःहि एक सुंदर साटणीची चंची बाळगली होती. आणि तिच्या प्रत्येक घरावर अभ्रकाचीं भिंग बसवलीं होतीं

या तिच्या चंचींतील पान ज्याला मिळेल त्याच्यावर अमीरची विशेष मर्जी अशी खूणगांठ तिच्याशीं गप्पा मारण्यास येणाऱ्या गावकऱ्यानीं बाधली होती त्यातऱ्या त्यात दशरथ पाटलाला या भाग्याचा वारंवार लाभ होत असे. " त्या बयाचं आणि दसऱ्याचं लई जमलंया " अशी गावात दाट कुजबूजहि होती. हा दशरथ पाटील म्हणजे गावातील काहीं लहानसहान प्रस्थ नव्हतं.

गावचा हक्कदार पाटील तोच होता. पण जबाबदारी नको म्हणून त्यानं ते अधिकार दुसऱ्याला बहाल केले होते. त्याच्या वडिलोपार्जित सावकारीचीं मुळं तर आजूबाजूच्या खेड्यातहि पसरलीं होतीं. त्यानं एकामागून एक तीन लग्नं केलीं होतीं. पण तीनहि बायका संसारसुखाचा आस्वाद न घेता परलोकीं निघून गेल्या होत्या. नाहीं म्हणायला त्याच्या तिसऱ्या बायकोनं पांच दिवसाच अर्भक त्याच्या पदरांत टाकलं होतं या बायकोच्या मृत्यूपासून दशरथाच्या आयुष्यक्रमांत नवीनच स्थित्यंतर घडून आलं होतं.

त्याचं शेतीवरील लक्ष उडालं होतं. सावकारीचा व्यवहारहि त्यानं आपल्या भावावर सोंपवला होता. त्याचा छोटा तुकाराम आणि तो.

तुक्याचं संगोपन करण्यांत,त्याला खांद्यावर टाकून हिंडण्याफिरण्यांत त्याचे दिवसामागून दिवस जात होते. आईवेगळं पोर म्हणून तो त्याचे अतोनात लाड करी. हसळी, मणगव्या, करदोटा, साखळया, पिंपळपान इत्यादि सोन्याचांदीच्या दागिन्यानीं तुक्याला त्यानं मढवून टाकलं होतं. दर बाजारीं त्याच्यासाठीं एक नवं अंगडं घरांत येत होतं. जरीच्या कुंचीशिवाय त्याला कुंची बाधली जात नव्हती. आणि तो जेवूं-खाऊं लागल्यापासून तर घरांत बिस्किटाचा आणि खाऊचा सुकाळ होऊन गेला होता. आणि दशरथ मुलाचे असे जरी परोपरीनं लाड करीत होता तरी मुलानं मात्र त्याच्या पदरात अपयशच बांधलं होतं. तुक्या चार वर्षांचा झाला होता तरी चालत नव्हता. बोलत नव्हता. एके ठिकाणीं सारखा बसून राही. त्याची वाढहि झाली नव्हती. मस्तक मात्र खूप मोठं पण इतर शरिराचा भाग दीड दोन वर्षाच्या मुला-सारखा. पोट खूप मोठं. हातापायावरची चामडी लोंबत असलेली, डोळे मोठे आणि भेसूर. असं कांहीं विचित्र असं त्याचं रूप होतं. दिसायला तो हिडीस दिसे. गावातील गरोदर स्त्रिया त्याला पाहण्याचं टाळत. एकच एक स्त्री त्याला जवळ घेई. ती म्हणजे अमीर. तुक्याला खांद्यावर टाकून अमीरच्या माच्यावर येऊन बसायचं हा दशरथ पाटलाचा ठराविक कार्यक्रम. ती त्याला वारंवार म्हणे,

"पाटीलसाब, मी सागतों त्या फकिराच्या पायावर हा छोकरा घाला. त्याचा नूर पालटला न्हाई तर अल्लाची कसम." जेव्हा जेव्हा दशरथानं तिच्याकडे जावं तेव्हा तेव्हां तिनं वरील उपाय सुचवावा. आणि एके दिवशीं खरोखरच त्याला पुढ घालून ती फकिराकडे गेली. नंतर दर गुरुवारीं दशरथ तुक्याला फकिराकडे घेऊन जाई. फकीर त्याला अल्लाचं नाव घेत कसला तरी रस पाजी. गळ्यांत नवी मुळी बांधी आणि दशरथाच्या स्वाधीन करी. अमीर पण त्याच्या बरोबर असे. दशरथ नको म्हणत असला तरी अमीरनंच तुक्याला खांद्यावर घ्यावं आणि वाट चालावी. जवळ जवळ सहा महिने त्याचा हा क्रम चालला होता. फकिराच्या करणीला गुण येत होता. तुक्या उभा राहून

एक पाऊल टाकत होता, अन् बोबडे एक दोन शब्द बोलत होता. त्याची वाढहि दिसूं लागली होती. दशरथाच्या आनंदाला पारावार नव्हता.

फकिरानं तुक्याचं औषध बंद केलं, तरी दशरथ त्याच्या दर्शनाला दर गुरुवारीं जाई. घरांत त्यानं पीर पुजावयालाहि सुरुवात केली होती. आणि फकिराचा प्रसाद म्हणून त्याच्या सागण्यावरूनच तुक्याचं नांव सुलतान ठेवलं होतं. " तुका सुलतान " म्हणून दशरथ त्याला मोठ्या कौतुकानं हाक मारी. अमीरचा आणि त्याचा स्नेहहि खूप वाढला होता. अमीरहि त्याच्याबरोबर फकिराकडे जाई.

" अमीर बी, तूं व्हतीस म्हनून हा पोरगा मला लाभला. आतां हा पोरगा तुझाच. " असं म्हणत दशरथ तिच्या नजरेला नजर देण्याचा प्रयत्न करी आणि अमीर " मेरा लडका ! " असं म्हणत उमलून आलेल्या भावना लपविण्याकरता ओढणी पुढें ओढी. त्याच्या या स्नेहासंबंधीं गावांत बरीच कुजबूज होई, पण तिला तोंड फुटलं नव्हतं. अखेरीस त्यासाठींहि एक दिवस उगवला.

त्या दिवशीं सकाळीं उठून गांवकरी आपापल्या उद्योगाला लागतात न लागतात तोंच अमीरबी घरांतून नाहींशी झाल्याची बातमी त्यांच्या कानावर आली. पण त्याबद्दल कुणालाच विशेष आश्चर्य वाटलंस दिसलं नाहीं. दशरथ पाटील नेहमींप्रमाणेंच गांवांतून हिंडत होता. एक गोष्ट मात्र गेले दोन दिवस गावकऱ्याच्या लक्षात आली होती. ती म्हणजे जानबा पाटलाचं शेतांतील घर !

जानबा पाटलानं म्हणजे दशरथाच्या भावानं बैल बांधण्यासाठीं व चारा ठेवण्यासाठीं शेतात एक खिडक्या दारं असलेलं खोपवजा घर बांधलं होतं. दशरथ गेले दोन दिवस तें घर झाडून सारवून घेत होता. बैल आणून बाहेरच्या पडवींत बांधले होते आणि एक पितळेचं चकचकित कुलूपहि त्याला अडकवलं होतं. लोक काय समजायचं तें समजून चुकले होते. पण दशरथ पाटलाला त्यासंबंधीं विचारण्याची कुणालाच छाती नव्हती. प्रत्येकजण आपापसांत बडबड करून स्वस्थ बसत होता. त्या

चार मुसलमान घराण्यातसुद्धा किती गडबड माजून राहिली होती. प्रत्येक-जण अमीरला शिव्या घालत होता, व 'रजाक आल्याबरोबर आम्ही सर्व मिळून दसऱ्याची खोड मोडणार ' अशी धमकी घालत होता

रजाक परगावीं असल्यानं दर आठपंधरा दिवसानीं गावात वस्तीला येत असे. त्याला ही बातमी कोणीं पोंचवली कुणास ठाऊक. पण अमीर नाहींशी झाल्याला दोन दिवस होतात न होतात तोंच रजाकनं रात्रीं बाराच्या सुमाराला जानबाच्या शेतातील घराचा दरवाजा ठोठावला. रजाक दारूनं तर्र होऊन तोंडाला येईल तें बडबडत होता न् दारावर लाथा-बुक्क्याचा भडिमार करत होता.

" कोन हाय त्यो " ? दशरथ सोटा घेऊनच बाहेर आला.

"म-मै रजाक हूं. हमारी अमीर कहॉं है–अमीर ! बुलाव अमीरकू " झोकाडे खात रजाक बोलत होता.

" अमीर के वास्ते तुम कायकू आया–अमीरबिमीर हम कुछ नहीं जानते चलो इधरसे. " जोरानं सोटा आपटत दशरथ ओरडला.

रजाकनं विक्राळ स्वरूप धारण केलं. तो दशरथच्या अंगावर धावून गेला

" हम नहीं जानते "–त्यानं दात विचकून दशरथाला वेडावल. "मगर कोन जानते–अमीर इधर तुम्हारे पास है । मै जानता हूं. अमीर तुमारे पास है । "

अन झटकन् " देखो " म्हणत त्यानं हात वर उगारला. चादण्याच्या सौम्य प्रकाशात तें सुरीचं पातं लखलखलं. दशरथाचे डोळे एकदम दिपले. आणि एकदम आतील दार उघडलं गेलं; दोन्ही दाराना हात टेकून दारात अमीर उभी होती.

" ओ रजाक-ए क्या है। हम नहीं आ सकते। तुम जाव " वहिणीचें हें शातपणानं दिलेलं उत्तर ऐकून रजाक नरमला त्यानं तिची किती तरी मनधरणी केली. तिच्यावर संतापला. शिव्या देऊं लागला. शेवटीं अमीर खवळली.

" गप्प बस मुकाट. त्या मोटर-मालकाचं घर मला दावलंस तवा कुठं गेली होती तुझी इज्जत. जातोस कीं काढूं चाबूक ? " म्हणत तिनं खुंटीवर टांगलेल्या चाबकाला हात घातला.

रजाक हळू हळू मागे जात दाराबाहेर पडला. त्या शांत वेळीं त्याचं अभद्र ओरडणं नंतर किती वेळ तरी त्या दोघांना ऐकूं येत होतं. अमीर दशरथाच्या खांद्यावर मान टाकून ढसढसा रडत होती बऱ्याच वेळानं डोळे पुसून ती म्हणाली,

" पाटीलसाब, आपण दूर कुठतरी जाऊं या. तो सैतान मला इथं ऱ्हाऊं देनार न्हाई. "

आणि त्या दिवशीं सकाळींच गावकरी शेतांतून जातांना चौकसपणानं घराकडे पाहतात तों घर सताड उघडं.

नुकत्याच कापण्या होऊन गेल्यानं शेतं ओसाड दिसत होतीं. धान्याच्या गाड्या घरात नेऊन भरल्यानंतर शेतकरी पुन: शेताच्या मशागतीला लागले होते. जानबानंहि शेतात सहा बैलांचा लोखंडी नांगर धरला होता. वर ऊन म्हणजे मी म्हणत होतं. पण नांगरटीचं काम अगदीं तालासुरात चाललं होतं. नांगराचा फाळ पुढं रेटता रेटता घामाघूम झालेला जानबा " वडऽरऽ वड ऽ बाळ्या वडऽऽ " म्हणून बैलांना उत्तेजन देण्यासाठीं मोठ्यानं ओरडत होता, तर अगदीं पहिल्या बैलजोडीच्या मानेवर बसून बैल हाकणारा तुका सुलतान त्याला साथ करीत होता. तुका आता चांगला सतरा अठरा वर्षांचा झाला होता. दशरथ नाहींसा झाल्यानंतर जानबानंच त्याला संभाळलं होतं. जानबाची बायको हिराबाई हिचं तर त्याच्यावर पोटच्या मुलापेक्षा प्रेम होतं या दोघांच्या प्रेमामुळें तुका सुलतान बापाला जवळ जवळ विसरून गेला होता

" सुलतान्या ओ ऽ सुलतान्या, तुझा बा आलाय बघ " कांहीं गुराखी पोरं धावत धावत शेतांत येऊन ओरडलीं.

तुका चटकन् बैलावरून खालीं उतरला. बैलांनीं पुढें ओढ घेतली आणि मागे झाले जानबानं फाळाचे हात सोडले.

" तो त्या सडकेला चिंचेबुडच्या झरा हाय न्हव, तिथं बसलाया-अक्षी फकिरावाणी हाया-आन् आमाला विचारीतो ' तुक्या कसा हाय• जानबा कसा हाय ? ' हीऽ दाढी वाढवलीया त्येनं. "

त्या पोरांचं बोलणं ऐकायला चुलते-पुतणे राहिलेच नाहींत.

खरोखरीच झऱ्याजवळ एक पाल माडून दशरथ बसला होता. किती बदल झाला होता त्याच्यात. त्याचा वेश फकिराचा होता. एक कटोरा, एक चटई आणि एक सोटा याशिवाय त्याच्या जवळ अधिक सामान नव्हतं.

जानबानं कडकडून आपल्या भावाला मिठी मारली. तुक्या स्तिमित होऊन पाहातच राहिला.

जानबानं दशरथाला घरीं चलण्याविषयीं खूप आग्रह केला. पण दशरथ म्हणाला—

" जान्या, कुणाचं घर ? कुणाचं दार ? मला पुनः त्या जाळयांत ओढूं नग. आता मला एक पाडुरंग-एक अल्ला ! "

दशरथाच्या तोंडून त्याची हकीकत ऐकल्यानंतर जानबाला कळून चुकल कीं दशरथ आता आपला राहिला नाहीं. तो कुणाचाच राहिला नाहीं. त्याचा मार्ग आता खूपच वेगळा आहे.

अमीरला घेऊन मुंबईला गेल्यावर दशरथानं पाच सहा वर्षं चागलीं सुखात घालवलीं होतीं पण मग अमीरला मुंबईची हवा मानवली नाहीं म्हणा, किंवा गिरणी कामाच्या त्रासानं म्हणा ताप येऊं लागला आणि शेवटीं ती क्षयानं झिजून मेली• दशरथ वेड्यासारखा झाला. कितीतरी दिवस तो त्या अफाट शहरांत फिरत होता. एका साधूच्या टोळक्यात सामील होऊन त्यानं कितीतरी प्रवास केला. शेवटीं फकिराच्या नादाला लागला. आणि फिरत फिरत ज्या फकिरानं तुक्याला बरं केलं त्याच्यापाशीं आला. त्याच्याच सागण्यावरून तो गावाशेजारीं येऊन राहिला होता.

दशरथ आल्याची बातमी हां हां म्हणतां आजूबाजूच्या खेड्यांतून पसरली. त्याला पाहायला लोक येऊं लागले. शेतकरी लोक जमले की

तो विठ्ठलाचं भजन सुरू करी, लोकहि त्यात भाग घेत आणि भजनाच्या गंभीर स्वरानीं तें वातावरण भरून जाई मुसलमान लोक आले कीं तो त्यांच्याबरोबर नमाज पढावयास लागे. त्यांना कुराणातील गोष्टी समजावून देई. आपल्या कटोऱ्यांत जें धान्य पडेल तें तो गाडग्यात शिजवून खाई. कुणीं काहीं देऊं केलं तर मुळींच घेत नसे. त्यानं थोडीं· फार औषधंहि जवळ ठेवलीं होतीं· हळू हळू लोकाचा त्याच्यावर विश्वास बसला. दुःखीकष्टी सासुरवाशिणी, सवतीमत्सरानं पीडलेल्या बायका, मुलासाठीं नवससायास करणाऱ्या स्त्रिया, याचं आणि शेत-कऱ्याचंहि तो विश्रातिस्थान होऊन बसला. त्याच्या औषधानीं गुण येऊं लागला. त्याच्या उपदेशानं सासुरवाशिणींना सुख लाभलं. हिंदु आणि मुसलमान शेतकऱ्यांत त्याला आदराचं स्थान मिळालं. " बाटका बुवा " या नांवानं तो ओळखला जाऊं लागला. कर्ज काढण्यापासून तों नवरी ठरवेपर्यंत प्रत्येक बाबतींत गावकरी त्याचा सल्ला घेत.

त्या दिवशीं—गुरुवारीं—त्याच्याकडे विशेषेंकरून मुसलमान लोक येत. ज्या ज्या वेळीं लोक त्याच्याकडे येत त्या त्या वेळीं त्याना तो झाडा-खालीं बसलेला दिसे तो गात असलेले अभंग किंवा कुराणांतील सूक्तं त्यांच्या कानीं पडत. पण आज लोकानीं त्या अपेक्षेनं दुरूनच झाडा-खालीं नजर टाकली. तो ते चमकलेच. त्यांना तिथं कुणीच दिसलं नाहीं जवळपास कुठं गेला असेल म्हणून ते तासभर थाबले इतक्यात एक बाई किंचाळतच धावत आली.

" हृत काय बसल्यासा ? तो बाटका बुवा पडलाया न्हवं का त्या झऱ्याच्या तोंडाशीं. "

लोक धावतच गेले. दशरथ झऱ्याजवळ उताणा पडला होता. त्याचं सर्व अंग काळं-निळं होऊन पडलं होतं. क्षणमात्र लोक स्तब्ध राहिले. " नाग डसलाया जणूं " एकान येणारं रडं आवरून बोलायला सुरुवात केली दोघातिघांनीं एकदम तोंडावर हात घेतले. क्षणांत जिकडेतिकडे कल्लोळ झाला.

आजूबाजूच्या खेड्यातून लोक जमायला उशीर लागला नाहीं.

जानबा दशरथला उचलायला पुढं झाला आणि लगेच चार पाच मुसलमानानीं त्याला मागें ढकललं, " बाटका बुवा आमचा आहे. आम्ही त्याचं दफन करणार. " मुसलमानानीं मागणी केली. दशरथ त्याच्याच ताब्यात होता " न्हाई न्हाई दसऱ्यादा माझा हाय, माझा भाऊ हाय ! ' असं जानबा ओरडत होता. गावकरी ' तो आमचा जातवाला हाय. त्याला आम्हाकडं द्या !' म्हणून हुज्जत घालीत होते. शेवटीं भाडण सुरू झालं आणि भाडणाचा शेवट मारामारींत झाला. दशरथाला तिथेंच टाकून दोन्हीकडील लोकांनीं जे हातात मिळेल ते फेकण्यास सुरुवात केली.

कालपर्यंत जें वातावरण भजनादिकानीं आणि धूपाच्या वासानं भरून गेलं होतं तेंच आता आक्रोशानं आणि शिव्यागाळीनं भरून गेलं. पुष्कळाना जखमा झाल्या. रक्ताच्या धारा वाहिल्या. शेवटीं जवळच्या शहरातून पोलिसाची मोटार आल्यावर सगळीकडे शात झालं.

मग दशरथाचा शेवट कसा काय लागला कुणाला ठाऊक. पण नंतर थोड्याच दिवसानीं त्या शेतात तें बाधकाम उभारलं गेल. अजून हिंदु व मुसलमान दोन्ही धर्मातील लोक त्याच्या दर्शनाला येतात. आणि तोहि त्याच्या नवसाला पावतो असं म्हणतात



# शेवडे मास्तरांची कमळी : ६

" कमळे, कुठ ग गेली होतीस इतका वेळ हुंदडायला ? " मैत्रिणीं-बरोबर खोकाळत आंत पाऊल टाकणाऱ्या मुलीला पाहताच मास्तरीणबाई ओरडल्या.

त्याचा वरचा सूर ऐकताच साऱ्याजणी पसार झाल्या आणि कमळीच काय ती तिथं उरली.

" कितीदा सांगितलंय तुला कीं, मारुतीच्या देवळात जायचं नाहीं म्हणून ? ह्यांनीं मला सांगून ठेवलंय कीं तुला पाठवूं नको देवळात म्हणून ! देवळात जाता, लोकर पाहायला दुकानात जाता, उगीच गोंधळ घालतां आणि येता. टवाळ लोक असतात जमलेले–उद्यांपासून मुळींच जायचं नाहीं त्या पोरींच्याबरोबर. सांगून ठेवतें. "

दुसरे दिवसापासूनच कमळीचं संध्याकाळीं बाहेर जाण बंद झाल. नट्टापट्टा करून तिच्या मैत्रिणी तिच्या दारावरून गेल्या तेव्हा ती उंबऱ्याशींच गहू निवडत बसली होती

" येणार का ग ? " एकीनं विचारलं

" अं हं, बाबा रागावतात. " असं म्हणून पुनः तिनं गहूं निवडा-यला सुरुवात केली.

केळकर बागेतील वठारात शेवडे मास्तर भाड्यानं राहात असत. कमळी ही त्यांची सर्वांत थोरली मुलगी. वयानं असेल सोळा सतरा वर्षांची इंग्रजी चवथी पास होतांच तिचं शिक्षण बंद केलं होत. तिच्या पाठचे तिघे भाऊ हायस्कुलात शिकणारे झाले, तेव्हा कमळीचं शिक्षण बंद पडणं साहजिकच होतं.

मुलीचं सोळा सतरा वय फार चमत्कारिक असतं. आपण नटावं थटावं, लोकांचं आपल्याकडं लक्ष जावं, आपलं कौतुक व्हावं, असं या वयात फार वाटत असतं. ज्या मुली शाळेत जातात त्याच्या या प्रवृत्तींना आपोआप वाव मिळत असतो. शाळेच्या निमित्तानं त्याचं केशवेषभूषेचं प्रसाधन सुरू असतं. बरोबरीच्या मुलींच्या मेळाव्यात अभ्यासादि विषयात मन रमतं. आत्मगौरवाचंहि समाधान त्याना लाभतं.

पण कमळी मात्र या साऱ्या सुखाला मुकली होती. सकाळपासून घरात कामाला लागावं भावंडांची न्हाणींधुणीं, उष्टशेण, भाडींकुंडीं, केरवारा यांत दिवस जावा. रात्रीचा स्वयपाक तिच्याच अंगावर असे. जरा कुठं जावं म्हटलं तर कडेवर एक आणि हाताशीं एक भावंड असायचंच. त्यापरतं तिला बाहेर जाणंच नको वाटे. वठारातल्या मैत्रिणीं-बरोबर जावं तर तेंहि आईनं आताशा बंद केलं होतं. त्यानं कमळी अगदीं चिडल्यासारखी झाली होती फावल्या वेळात कोणाकडून तरी मागून आणलेला 'स्त्री' चा अंक वाचणं हीच तिची करमणूक होती. फारच जर वेळ जात नाहींसा झाला तर मुलाला कडेवर घेऊन दाराशीं उभं राहावं.

हल्लीं हल्लीं तर तिच्या स्वप्नाळू रिकाम्या मनाला एक विचित्रच नाद लागला होता. शेजारणी कामानिमित्तानं घरीं येत आणि तिची लग्नासंबंधीं चेष्टा करीत.

" मास्तरीण काकू, त्या तमकीचा भाचा कसा फक्कड आहे. बघा तुमच्या कमळीला. "

" आमची सून करून घेऊं आम्ही कमळे तयार आहेस का ? "

अशा त्यांच्या गप्पा चालल्या कीं कमळी लाजून तिथून उठून जाण्याचा आव आणी. पण मनापासून तिला त्या गप्पा आवडत.

कधीं तिच्या शाळेंत जाणाऱ्या मैत्रिणी तिला भेटत. त्यांच्या आपसांत गप्पा चालल्या कीं कमळी मोठे डोळे करून त्या ऐकत राही. तिच्या ज्या दोघी तिघी मैत्रिणी मुलांच्या शाळेंत जात त्या एकत्र जमल्या

कीं एका विशिष्ट मुलाबद्दल नेहमीं बोलत त्या मुलाला कधीं कमळीनं पाहिलं नव्हतं पण त्याची सर्व माहिती तिला होती–तो वर्गात नेहमीं मधल्या रांगेत दुसऱ्या बाकावर बसे तो दिसायला काळासांवळा पण छान होता तो नेहमीं उंची सूट वापरी त्याच्या गळयातील सोन्याची बारीक चेन त्याला फार शोभून दिसे. शिक्षकाशीं विनोद करून मुलींच्या बाकाकडे मिस्कीलपणें नजर टाकण्याची त्याची संवय होती. क्रिकेट टीमचा तो कॅप्टन होता. कमळीच्या मनापुढे आपोआपच त्या मुलाचं चित्र उभं राही. आणि हा काल्पनिक अनिरुद्ध तिचं मन अस्वस्थ करून सोडी.

ती राहात असलेल्या गल्लीच्या कोपऱ्यावर हल्लीं एक शिवण कामाचं नवीन दुकान निघालं होतं. कपडे शिवून घेण्याच्या निमित्तानं कमळीला वारंवार तिथं जावं लागे कपडे आणण्याच्या ओढीपेक्षा त्या दुकानाच्या मालकाला पाहण्याची तिच्या मनाला अधिक ओढ असे. त्या दुकानांत तयार केलेले निरनिराळ्या पद्धतीचे ब्लाऊझ मोठ्या आकर्षक पद्धतीनें टांगून ठेवलेले असत. गिऱ्हाइकास बसण्यासाठीं एक बाक आडवा टाकलेला असे. आणि या मशीनच्या मागं त्या सर्व पसाऱ्याचा मालक बसलेला असे. मशीन सारखी सरसर चालूं. खाद्यावर टेप टाकून तो दोन्ही हातानीं झरझर सुईखालीं कापड सारी. कुणी दुकानाशीं आलं कीं खालच्या मानेनंच मशीनमागून वर पाही. त्याचे ते काळेभोर कुरळे केस, दाट रेखीव भुंवया आणि लालसर पिंगट डोळे. कमळीला दाराशीं पाहिलं कीं स्नेहभावानें तो हंसे. कमळीच्या मनांत खोल कुठंतरी चाळवल्यासारखं होई आणि संकोचानं ती बाकावर बसे. मशीनवरच्या कपड्यावरचीं त्याचीं तीं रुंद मनगटं आणि लांबसडक बोटं, ती खड्याची लाल आंगठी यांकडे वारंवार तिला पाहावंसं वाटे. आणि घरात देखील फावल्या वेळात कमळी रिकामी असली कीं, हा दुकानचा मालक मशीन चालवत असताच खालच्या मानेनं वर पाहून, स्नेहभावानें हंसे. आपल्या मनाचा हा खेळ पाहाण्यांत कमळी रंगून जाई.

पण हे फक्त मनातच. प्रत्यक्ष व्यवहारात जगांतील कोणत्याहि

तरुणाविषयीं तिला धसका वाटत असे. इतका कीं कुणी अनोळखी तरुण दिसला तरी तिला बावरल्यासारखं होई; चेहऱ्यावर कडवट गंभीरपणा आणून ती पुढें चालूं लागे. असं तिला वाटायला तसंच कारण झालं होतं.

जी शेजारीण तिला 'सून करून घेईन' म्हणत होती, तिचा मुलगा मॅट्रिकला दोनदां गोते खाऊन कुठें तरी नोकरीला लागला होता. शेवडे मास्तराच्या घरचं वळणच असं कीं, कमळीची व त्याची ओळखहि झाली नव्हती. पण आईनं केलेल्या चेष्टेमुळें कीं कशामुळें कुणाला ठाऊक, त्या मुलानं एकदा कमळीला एक पत्र लिहिलं आणि तें पाकीट दाराशीं कमळी एकटीच आहे असं पाहून आत टाकलं. कमळीला हा काहीं विचित्रच प्रसंग वाटला. तिच्या मनाला कापरं भरलं. भीतभीतच तें पाकीट ओच्यात लपवून ती न्हाणीघरात गेली. आणि दरवाजा बंद करून तिनं तें पाकीट फोडलं त्या मुलाचं अक्षर फार सुंदर होतं आणि त्या अक्षरात त्यानं प्रारंभींच लिहिलं होतं 'प्रिय कमल.' पत्रांत त्यानं तिची खूप स्तुति केली होती. तिच्याशीं एक शब्द तरी बोलतां यावा म्हणून तळमळ दाखविली होती आणि शेवटीं 'तुझा अनंत' या शब्दानीं पत्र पूर्ण केलं होतं. कमळीच्या आयुष्यांत हें सर्व नवीन आणि अद्‌भुत होतं. पत्र वाचत असतांना तिच्या मस्तकांतून कसल्या तरी झिणझिण्या निघत होत्या. जणू ती कुठल्या निराळ्या विश्वात वावरत होती. पण तें क्षणापुरतंच. त्यातून ती जी वास्तवात उतरली ती शेवडे मास्तराची मुलगी म्हणूनच. 'काय हलकटपणा तरी' म्हणतच तिनं दार उघडलं आणि दणदण पाय आपटीत ती आईपाशीं गेली.

"त्या मामींच्यापाशीं नेहमीं माझी थट्टा करतेस नाहीं? बघ त्या मेल्यानं मला कसं पत्र लिहिलंय तें"

तिनं तें पत्र आईच्या अंगावर फेकलं आणि ती चालती झाली हें प्रकरण मग शेवडे मास्तरांच्यापर्यंत गेलं आणि मास्तरनीं त्याला घरात बोलावून प्रत्यक्ष त्याच्या आईसमोर त्याला छडीनं उभा फोडला.

कमळीनं दाराच्या फटींतून हा भयंकर प्रकार पाहिला. त्या दिवशीं ती जेवली नाहीं त्या दिवशीं तिला झोंप आली नाही. ती सारखी या कुशीवरून त्या कुशीवर वळत होती. आणि तिच्या डोळ्यांतून सारखं पाणी निथळत होतं. तें सुंदर अक्षरातील पत्र तिच्या डोळ्यासमोर उभं राही आणि तिला एकदम हुंदका येई. त्या दिवसापासून त्या मुलाची आणि तिची दृष्टादृष्ट झाली तर तो असं कांहीं तिच्याकडं पाही कीं, तिच्या मनाचं पाणी पाणी होऊन जाई. या दिवसापासूनच जगातल्या कोणत्याहि तरुणाविषयीं तिला धसका वाटूं लागला होता.

अलीकडे तिचं मन निराळ्याच एका व्यक्तीनं वेधून घेतलं होतं ही व्यक्ति तिच्या घरासमोरील बाजूच्या घराच्या खोलींत राहायला आली होती. दारांत उभं राहिलं कीं त्याच्या खोलीचं दार तेवढं तिला दिसे. पण निरीक्षणाअंतीं तिनं हेरलं होतं, कीं ही स्वारी सकाळीं सव्वासातच्या सुमाराला हातीं जाळीची पुस्तकाची पिशवी घेऊन बाहेर पडते, ती दुपारीं बाराच्या सुमाराला घरीं परतते, पुनः तीनच्या सुमाराला घरा-तून निघते ती संध्याकाळीं साताच्या सुमाराला घरीं येते या वेळीं बरोबर पाच सहा मित्रहि असतात. कमळीचं लक्ष जावं अशीच ती व्यक्ति होती. गोरापान, नाकेला आणि घाऱ्या डोळ्याचा असा तो तरुण होता. पायात साध्या वहाणा, पाढरं शुभ्र धोतर, किरमिजी रंगाचा कोट आणि काळी टोपी असा साधा पोषाख असे. मराठी ट्रेनिंग कॉलेजचा तो विद्यार्थी होता. त्याच्या जात्यायेत्या वेळेला कमळी दाराशीं असायचीच. सकाळीं सडारांगोळीसाठीं, दुपारीं काहीं निवडण घेऊन, संध्याकाळीं भावडाला खेळवत अशी ती दाराशीं असे. त्या तरुणानंहि हें ओळखलं असावं. जातां येता तोहि कमळीच्या दाराकडे नजर टाकल्याशिवाय पुढें जात नसे. या ओझरत्या दर्शनावर कमळीचा साधाभोळा जीव दिवस-भर गुगत राही.

'खरंच आपलं यांच्याशीं लग्न व्हावं. किती छान आहेत हे. आणि संध्याकाळीं अलगूज तरी किती छान वाजवतात! ते शाळेंत नोकरी करतील; मग मीहि शाळेंत नोकरी करीन. आपला संसार किती छान

रंगेल '—अशा मनोरंजनात दिवसामागून दिवस कसे जात होते तें तिचं तिलाच कळत नव्हतं. दोन वर्षं अशीं झरझर निघून गेलीं, आणि एक दिवस तो तरुणहि ती खोली सोडून गेला. पण ही गोष्ट कमळीला समजली ती या प्रसंगानं.

त्या दिवशीं रात्री शेवडे मास्तर जेवायला बसले होते. मास्तरीणबाई वाढत होत्या, सारीं मुलं माजघरांत झोपलीं होतीं. आणि कमळी तान्ह्या मुलाला पायावर पालथं घालून थोपटून माजघराच्या उंबऱ्याशीं बसली होती. हल्लीं पाच सहा दिवस ' त्या'चं दर्शन होत नव्हतं म्हणून ती अस्वस्थ झाली होती.

" ऐकलंस का ग, आज ते समोरचे कुलकर्णी म्हणत होते, "—शेवडे मास्तरनीं आमटीचा भुरका मारला

" काय म्हणत होते ? "

" त्याच्या घरात कोणी विद्यार्थी राहात होता ना ? "

" असेल बाई. कुणी पाहिलाय,—मग ? "

" तो आता गांवीं गेला. त्याचं त्याना पत्र आलंय."

" अस्सं ! काय म्हणून ? "

" तो म्हणतो म्हणे—शेवडे मास्तराच्या मुलीसाठीं तुम्ही—माझं नांव सुचवा. "

" अगो बाई ! बराच आहे कीं—मग तुम्हीं काय सांगितल ? "

" अग, तसं त्याचं उत्पन्न वगैरे चागलं आहे. पण माझी मुलगी मी त्याला देणार ! मीं साफ सांगितलं त्यांना कीं त्याला कळवा—कीं शेवडे मास्तरची मुलगी म्हणजे कांहीं भटाभिक्षुकाची पोरगी नव्हे. "

कमळीला पुढं ऐकवेना. मुलाला पाळण्यांत घालण्याच्या निमित्तानं ती तिथून उठलीच. जातां जातां तिच्या कानीं आलं

" पण आतां स्थळ नको का पाहायला ? "

" कमळीसाठीं स्थळांना काय तोटा ! आता तयार आहेत. आपलीच तयारी हवी."

पण शेवडे मास्तरांनीं मुलीसाठीं खटपट केल्याचं कधीं दिसलं नाहीं.

स्थळ काय लग्न करायच म्हणताच केव्हाहि मिळेल. आणि तेंहि तोला-मोलाचं अशी त्यांची खात्रीच असावी. पण दर वर्षी या ना त्या कारणांनीं कमळीच्या लग्नाचा बेत लाबणीवर पडत होता. एका वर्षी मुलाच्या मुंजी झाल्या आणखी पुंजी खर्चं झाली दुसऱ्या वर्षी मास्तरीण-बाईचं बाळंतपण आलं. तिसऱ्या वर्षी मुलगा गेल्यानं आईवडील दुःखी-कष्टी होते. अशाच काहीं निमित्तानं कमळी आज सहा वर्षं लग्नाची राहून गेली होती.

तिच्या मनाची कळीहि आताशा कोमेजून गेली होती. दुसऱ्याच्या संसारांत शिणून तिच्या चेहऱ्यावर निबरटपणा दिसूं लागला होता, गाल किंचित् बसल्यासारखे झाले होते. आणि अगलटीचा रसरशीतपणा जाऊन ती चोपल्यागत दिसूं लागली होती. मनांतहि ती चोपून गेली होती. मनांत आलं कीं, छाती फुटेपर्यंत घरातील काम ओढावं नाहीं तर दुपारीच्या दुपारी डोक्यावरून पाघरूण ओढून झोंपून काढाव्या

त्या दिवशीं संध्याकाळीं ती धाकट्या भावाला भरावेण्यासाठीं त्याला कडेवर घेऊन दारात उभी होती. काऊचिऊला हाक मारून घास घालण्याचं तिचं काम रंगात आलं होतं. वळणावरून गल्लींत कोणी शिरल्याचं तिला दिसलं. तिनं गाणं थांबवून येणाऱ्या व्यक्तीकडे पाहिलं शंकाच नाहीं तोच होता तो. पाच सहा वर्षांपूर्वी विद्यार्थी म्हणून जो त्या समोरच्या खोलींत राहात होता, तोच आता समोरून येत होता. त्याच्या हातात एक प्रवासी बॅग होती. तिच्या जवळ येताच तो थबकला.

“ अजून विसरले नाहींत ” कमळीला वाटून गेलं. या सहा वर्षांत त्याच्यात देखील बदल झाला होता. त्याचा गोरेपणा किंचित् काळ-वंडला होता. ऐन तारुण्यातील चेहऱ्याचा नाजूक गोडवा दिसत नव्हता. त्याच्या गालाचीं हाडं किंचित् वर आल्यासारखीं दिसत होतीं. चेहऱ्याला एक प्रकारचा पुरुषी राकट रेखीवपणा आला होता.

“ इकडं कुठं तुम्ही ? ” कमळीनं आवंढा गिळला. तोहि तिच्याशीं आज प्रथमच बोलत होता. पण त्या बोलण्यांत सहजसंकोच नव्हता

" आणि तुम्ही—माहेरीं मुक्काम दिसतो. " वरील मुलाकडे पाहात त्यानं विचारलं.

" सासर माहेर कांहीं नाहीं. माझी धाकटी बहीण आहे ती."

" अस्सं ! "

" मी आलों होतों–यांची सोय लावून देण्यासाठीं. मागें दोन हातावर उभ्या असलेल्या व्यक्तीकडे पाहात तो म्हणाला. आतां कुठं कमळीचं त्या व्यक्तीकडे लक्ष गेलं एक सतरा आठरा वर्षांची मुलगी त्याच्यामागं उभी होती.

" ही शांताबाई माझी बायको. यंदा ट्रेनिंगकडे घातली आहे तेव्हां पूर्वी मी राहात होतों त्याच खोलींत तिची राहाण्याची व्यवस्था करून देणार आहें, म्हणून आलों. "

" शांते, मग याची ओळख करून घे बरं का " असं म्हणत तो पुढें झाला. त्याची शाताबाईहि त्याच्या मागून गेली. त्यानं दाराचं कुलूप काढलं आणि दार उघडून तो आत गेला शाताबाईहि आत गेली आणि दार बंद झालं.

कमळी हें सर्व डोळे विस्फारून पाहात होती. आपल्या मनातलंहि कुठलंसं दार धाडकन बंद झाल्याचा तिला भास झाला आणि ती केव्हढ्यानं तरी दचकली. तिच्या मनस्थितीची कांहींच कल्पना नसणारं तिच्या कडेवरील मूल आता रडूं लागलं होतं. तिनं त्याला सोप्यावर दणकन् आपटलं. आणि त्याच्या उघड्या गुबगुबीत गालावर पाच सहा चपट्या लगावल्या. तें कळवळलं. मास्तरीणबाई धावतच बाहेर आल्या.

" अग, काय हें मारणं तुझं—"

" तर तर—छळवाद माडलाय कार्टीनं, मरेन तर सुटेन एकदाची–" असंच कांहीं बडबडत ती आत गेली. हातातलं ताट तिनं मोरींत टाकलं त्या आवाजानं घर झणझणून गेलं.

मास्तरीणबाईनीं एक उसासा सोडला आणि मुलाला पदराखालीं घेतलं.

● ● ●

## तें बुडणारं मूल : ७

निपाणीचा रस्ता गांठण्यासाठीं डॉक्टर शेतातील बांधाबाधानं झपाझप पावलं टाकत निघाले होते.

ज्यांनीं डॉक्टरना या रस्त्यानं जाताना नेहमीं पाहिलं होतं त्याना आजचं त्याचं जाणं किती चमत्कारिक वाटलं असतं. आठ पंधरा दिवसानीं त्याची या खेडेगावात एक खेप होत असे. आणि प्रत्येक वेळीं त्याचं निपाणीला परत जाणं म्हणजे जणू कांहीं एक छोटासा समारभच व्हायचा. सर्वांत पुढं इनामदाराचा मोत्या दौडत असायचा. त्यानंतर मनमोकळेपणानं हंसत गावकऱ्याशीं गप्पा करीत जाणारे डॉक्टर. त्याच्यामागून त्याची औषधाची बॅग घेतलेला नाना सनदी, काठीचा झणत्कार काढीत चालणारा सात्या तराळ, गांवकामगार पाटील आणि अवांतर आठदहा मंडळी असायची. वडांच्या गर्द कमानींतून जाणाऱ्या त्या तांबड्या लाल रस्त्यावर ही मंडळी मोटर येईपर्यंत उभी असत. मोटरींत डॉक्टर बसून मोटर हलेपर्यंत गप्पा चालत. डॉक्टर निपाणीकडे गेले कीं गावकरी मंडळी परत गांवाकडे येत.

पण आज डॉक्टरांच्याबरोबर कुणीच नव्हतं. त्यांच्या चेहऱ्यावर नेहमीं उसळत असलेलं वात्सल्ययुक्त हास्यहि आज दिसत नव्हतं. ' मी बॅग घेतों द्या जी. ' म्हणून भीत भीत मागून येणाऱ्या सात्या तराळाला त्यानीं चावडींतूनच मार्गे लावून दिलं. चिकाटी धरून शेपूट हालवीत त्याच्याबरोबर येणाऱ्या मोत्याला त्यानीं दोन दगड मारून पांदींतूनच परतवून लावलं. आणि आतां ते एकटेच चालले होते. वर अभाळांत

ढग जमून आले होते. झोबणारा गार वारा सुटला होता. उद्वेग आणि संताप यानीं डॉक्टराचा चेहरा अजूनहि ग्रस्त दिसत होता.

शेतांतून छाती इतका वर आलेला जोंधळा सळसळून आपल्या धारदार पात्यानी डॉक्टराची वाट वारंवार आडवीत होता भुईमुगाचे वेल पावसाचं पाणी पिऊन सुस्तीनं अस्ताव्यस्त पसरले होते. काळ्याभोर शेतांतील राकेनं लावलेलीं तंबाखूचीं रोपटीं नुकत्याच उभे राहणाऱ्या मुलाप्रमाणें धडपडत होतीं. पाढऱ्या नाजूक फुलानीं नटलेल्या मिरच्याच्या शेताकडे पाहून चिरमुडया मुलींची तर शाळा सुटली नाहीं असा भास होत होता. मध्येंच उंच टेकडीवर एकच एक असलेल आपव्याचं झाड, 'तुम्हाला जर सृष्टिशोभा पाह्यची असेल तर माझ्याकडे या' असें येणाऱ्या जाणाऱ्याला आवर्जून सागत उभं होतं आणि पाठीमागं तें चिमुकलं खेडेगाव! यथास्थित स्तनपान करून आईच्या मांडीवर सुस्त होऊन पडलेल्या निर्व्याज बालकासारखं निसर्गाच्या माडीवर पडलं होतं.

पण यापैकीं एकाहि देखाव्यावर डॉक्टराची नजर खिळली नाहीं. सकाळींच इतक्या उत्साहानं डॉक्टर त्या गावात आले होते. अन् आतां तितकेच त्रासून ते परत चालले होते. त्या चिमुकल्या खेडयात असं काय घडलं होतं, कीं ज्या योगानं डॉक्टराच्या मनात वादळ उठलं होतं? त्या साध्याभोळ्या लोकाकडून असा कोणता अपराध झाला होता, कीं तो डॉक्टराना अक्षम्य वाटला होता?

पंधरावीस दिवसापूर्वीं असेच एकदां डॉक्टर गांवीं आले होते. गांवच्या इनामदारानीं त्याना मुद्दाम गडी पाठवून बोलावून आणलं होतं. आजूबाजूच्या खेड्यातून प्लेगची लागण चाललेली त्याना समजली होती, म्हणून आपल्या कुटुंबातील सर्व मंडळींना ते लस टोचवून घेणार होते. आल्यानंतर चहा वगैरे आटपताच डॉक्टरानीं कपडे उतरले. शर्टच्या बाह्या वर चढवल्या आणि स्टोव्हवरील उकळत्या पाण्यात चिमटयानं सुई टाकली. एकेकाला ते पुढें बोलवत होते. आयडिनचा

दर्प सर्व सोपाभर दरवळला होता. शेतकऱ्याचीं काहीं पोरं कुतूहलानं दाराशीं गर्दी करून उभीं होतीं. " टोचूं का रे तुम्हाला ?" म्हणून डॉक्टर पुढें जाताच तीं गिल्ला करीत पसार झालीं. इनामदाराच्या मंडळींना टोंचून उरलेल्या लसीनं तिथंच रेंगाळणाऱ्या भिम्याला त्यानीं पकडून टोचलं.

" अरे सनदी, जरा पाटलाना आणि गावकऱ्याना चावडींत बोलाव. माझं काम आहे थोडं." असं म्हणत डॉक्टरानीं आपली बॅग आवरली.

हळूहळू गावकरी चावडींत जमूं लागले. कुणी म्हातारे नुसती लंगोटी लावून आणि अंगावरून कावळं पांघरून आले होते कुणी अगदीं मळकट कपडे घालून आले होते. कुणाचीं कुडतीं फाटल्यानं दोन्ही खांदे उघडे पडून चिंध्या लोंबत होत्या. कुणाच्या फाटक्यातुटक्या मुंडाशातून केसाचीं झुलपं बाहेर पडलीं होतीं. कुणीं गुलाबी धोतर नेसून पटक्याचा शेमला वाऱ्यावर फडफडत ठेवला होता. कुणीं चंची उघडली होती, तर कुणीं चिलीम भरण्यात गुंतले होते. त्या सर्वांच्या अंगाच्या दर्पातच तंबाखूचा दर्प मिसळून वातावरण कुंद होऊन गेलं होतं.

" रामराम साहेब, कशापार्यी हटकल्यासा-" म्हणत प्रत्येकजण जागा मिळेल तिथं बसला होता. चावडी भरलेली पाहताच डॉक्टरनीं बोलायला सुरुवात केली.

" हें बघा-या गांवाच्या आसपासच्या खेड्यांनीं प्लेग सुरू झालाय्-"

" व्हय जी-पिलिग आलाया लई लई वंगाळ रोग बघा. माणूस उठतच नाहीं. त्या चिकोडींत काय माणसं मरत्यात्या-अबबब !"

" हां हां. तेव्हां तो प्लेग आपल्या गावात येता कामा नये-" अशी सुरुवात करून डॉक्टरनीं मग खूप वेळ बोलण सुरू ठेवलं. प्लेग कसा होतो-त्यासाठीं उंदरांचा कसा नाश करावा—घरं कशीं स्वच्छ करावीं याहि गोष्टी त्यांनीं समजावून दिल्या. आणि खात्रीचा उपाय म्हणजे लस टोंचून घेतली पाहिजे असं त्यांनीं सांगितलं. नुसतं सांगूनच राहिले नाहींत तर " लौकरच बरीच लस घेऊन येणार आणि सर्वांना

टोंचणार" असहि त्यांनीं सर्वांना बजावलं. आणि ते जेवायला घरीं परतले.

जेवतांना इनामदार त्यांना म्हणाले, " अडाणी लोक हो हे डॉक्टर कोणीहि टोंचून घेणार नाहीं त्याना या गोष्टी पटतच नाहींत. अहो, देवीडॉक्टर आला तर हीं माणसं पोरं लपवतात—आता सांगा—"

" अडाणी खरेच. पण आपण त्याना पटवून द्यायला पाहिजे—"

" पाहा बुवा-आतां तुमच्या पुण्याईचा जोर असेल तर पटेल त्याना— "

" गरीब बिचारे लोक !—" डॉक्टर उद्गारले.

डॉक्टराना गरिबाचा नेहमींच कळवळा असे. त्यातल्या त्यात या खेडेगावातील लोकावर त्याचा अधिकच लोभ जडला होता. इनामदाराच्या निमित्तानं त्याची या गावाशीं ओळख झाली होती आणि ती तशीच वाढत गेली होती ते दूध घेत ते या गावातील रामा गवंडीकडचं. त्याची वर्षाची सरपणाची तरतूद करायची ती या गावांतील लोकांनींच. त्यांना जें कांहीं धान्य विकत वगैरे घ्यावं लागे तें ते या गावांतूनच घेत. इतकंच काय, नेहमीं आणि वर्षाकाठीं त्याचं घर सारवायचं काम याच गांवांतील बायका करीत निपाणीलाच त्याचं घर असल्यामुळं दर गुरुवारीं डॉक्टराच्या घरात कोण वर्दळ ! या साध्याभोळ्या पाहुण्यांना डॉक्टराकडून प्रेमाची विचारपूस आणि सोबत गुळाचा खडा न् पाणी कधीं मिळालं नाहीं असं होत नसे. ज्या ज्या वेळीं ते गांवीं जात त्या त्या वेळीं कोणी आजारी असल्यास चौकशी करून मुद्दाम त्याच्या घरीं जाऊन त्याला औषधपाणी करीत. या लोकाकडून ते पैशाची विशेष अपेक्षा करीत नसत.

त्या गावकऱ्याचाहि डॉक्टराच्यावर लोभ जडला होता. गावांत कुणाची म्हैस व्याली आणि तिचा पावशेर तरी चीक डॉक्टराच्या घरीं गेला नाहीं असं कधीं झालं नाहीं. भाजीपाला, हुरडा, ओल्या शेंगा,

मिरच्या, उसाचा रस, असं कांहीं ना कांहीं त्यांना थोडं फार देऊन गावकरी त्याच्याविषयींची कृतज्ञता व्यक्त करीत.

गांवांतील लोकांना टोंचण्यासाठीं पुन्हां येणार म्हणून आश्वासन देऊन डॉक्टर घरीं गेले त्याला दोन-तीन दिवस झाले असतील. सकाळी रामा गवंडी दूध घेऊन आला तेव्हा डॉक्टर कुणाला तरी तपासत होते. आत रामा डॉक्टरीणबाईंना कांहीं सांगत होता तें ओझरतें ऐकूनच डॉक्टरांनीं स्टेथॉस्कोप एकदम कानातून काढला. " रामा, अरे बोलतोस काय ? गुरवाचा भिम्या मेला ? आणि मला कळवलं नाहींत कुणी ? " डॉक्टर घरात आले.

" लोकं त्याला पोंचवून आलीं न् म्या हकडं निघालों नव्हं का. फाटचाच ग्येला त्यो. तुमी त्येला टोंचलं पघा-तो जो त्याला जाळ भरला-त्याला सुमारच न्हाई अन् आज उडाला न्हवं काय ? यवढी यवढी पोरं हैतं. अन् म्हातारी आई हाय न्हव जी त्येला. "

त्या दिवशीं दिवसभर डॉक्टर अगदीं बेचैन होते. तो तरणाबांड काळारोम भिम्या त्यांच्या डोळ्यासमोरून हालत नव्हता. त्याचं तें गुलाबी धोतर, तो रुप्याचा रुंद कडदोटा, गुलाबी फेटा आणि आगठ्यामधील रुप्याच्या आंगठ्या—तो समोर उभा असल्यासारखं सारं कांहीं त्यांना दिसत होतं. गेल्या वर्षीं त्यांनीं जोंधळ्याचीं पोतीं खरेदी करून आणलीं तर एकट्या भिम्यानं रस्त्यावरल्या गाडींतील सव्वा मणाचीं भरलेलीं पोतीं उचलून आत आणून सारीं व्यवस्थित लावून ठेवलीं होतीं एवढा ताकदवान् तो अन् चार दिवसात उडाला—अन् तोहि मीं टोचल्यावर—हे विचारच त्यांच्या मनाला तापवीत होते. नुकताच तो चिकोडीहून प्लेगचा संसर्ग घेऊन आला असला पाहिजे आणि त्यातच आपण त्याला टोंचलं. त्याच्या मरणाचा आपल्या टोंचण्याशीं कांहीं संबंध नाहीं—हें त्यांना कळत होतं. पण—

नंतर गंग्या तेली त्यांच्याकडे आला तो किती तरी वेगळ्या बातम्या घेऊन. तो म्हणाला,

" काय सागं दादा–भिम्या मेल्यापासन अक्शी वात्रटळ उठल्यागत झालय बघा गावात. गोविंदा पाटलाच्या घरांत उंदीर बी मिळालं मेलेलं. सारा गाव कसा काचबारल्यागत झालाय् बघा. कायबी सुचना."

खरोखरीच गावातले लोक अगदीं बावरल्यासारखे झाले होते. वेशीवर, चावडींत, देवळात, दाराघुढल्या गाडीवर जिकडे तिकडे थव्याथव्यानं बसून लोक विचार करत होते, " आतां काय करायचं गा ! "

आणि एके दिवशी चावडींत लोक जमवून पाटलानं केवढा चमत्कार सांगितला होता. पाटलाच्या आईला आज लागोपाठ तीन दिवस स्वप्न पडत होतं.

पांढऱ्या शुभ्र उंच अशा बैलांची हनमजोडी लावलेली एक कोरी करकरीत गाडी वेशीसमोर येते. आत शिरण्याचा प्रयत्न करते. बैल मोकळ्या रस्त्यालाच धडक दिल्यासारख करतात. पण गाडी आत येऊं शकत नाहीं त्या गाडींत एक गोरीपान सवाष्ण बाई बसलेली असते. तिच्या कपाळावर हिरव्यागार गोंदवणावर चागलं रुपयाएवढं कुंकू लावलेलं असतं. ठुशी, सरी, पुतळ्याची माळ यानीं तिचा गळा भर-लेला असतो. दंडात वाकी, मनगटात गोठ तोडे अन् पांची बोटात आंगठ्या असतात. काळभोर रेशमी लुगडं ती नेसलेली असते अन् पिवळीधमक चकचकीत चोळी तिच्या अंगांत असते. ती गाडींतून पुढें मान काढून म्हणते–" मला बाहेर का ठेवता ? मला आत घ्या कीं ग. मला विसरलां काय ग ? मी एक बळी घेतला, त्यानं तुमास्नी अक्कल आली नाहीं काय ग ? ऐका ग. मला आत घ्या. माझं देणं द्या —मी तुमच्या गांवांतल्या कोंबडीच्या पिल्लाला बी धका लावूं देणार न्हाई. "

असं स्वप्न पाटलिणीला सतत तीन रात्रीं पडलं होतं, आणि सारा गांव त्या स्वप्नाचा अर्थ बांधण्यात गुंतलं होतं. शेवटीं गावांतल्या जाणकार अशा रामा गुरवानं अर्थ लावला. आई मरगाई आपण होऊन गावात येणार आहे. तिचा आपण वार पाळला पाहिजे. अन् तिचं देणंहि दिलं पाहिजे.

मंगळवार हा पाळकवार म्हणून पाळण्यांत आला. त्या दिवशी कोणीहि शेतावर वा मोलमजुरीनं कामाला गेलं नाहीं. सर्वांनीं आपलीं घरं सारवलीं. वेशीच्या दाराशीं एक भला मोठा दगड चुना लावून उभा केला. त्याला झेंडूची व चाफ्याची माळ करून घातली ही देवी राखण म्हणून वेशीवर बसवली होती प्रत्येक घरापुढेंहि भिंतीच्या कोनाड्यात गावकऱ्यानीं राखण बसवली होती. पुरणाचं जेवण केलं होतं आणि रात्रभर देवळात भजन उभं होतं.

गंग्या तेल्याकडून ती सर्व हकीगत ऐकून डॉक्टरानीं एक सुस्कारा सोडला.

" हें असं करून काय होणार गंगाराम ? लोकाना म्हणावं, उंदीर पडताहेत तर गांवाबाहेर झोपड्या बाधून रहा. आजूबाजूच्या कुठल्या खेड्यांतून हिंडूं नका. "

" दादा, तुमी आता असं काय बी सागूं नगसा. लोकं बोलत्यात भिम्याला टोचल्यापाईच मरगाई कोपलीया–"

डॉक्टर मोठ्यानं हसले आणि हसं ओसरल्यावर म्हणाले,

" बर पाटलांना म्हणावं, मी शनिवारीं येतों गांवांत, मग पाहूं. आणि हें पाहा, आंत जाऊन चहा घे बाईच्याकडून "

" शनिवारीं येता तेंच बेस दादा. शुक्रिवारीं सारा गाव मरगाईचं देणं द्यायला जाणार हाय ! "

" देणं तें कसलं बुवा ? "

" केवढी मोठी जत्रा भरंल जी अन् घरपट्टी बकरं, न्हाईतर कोंबडं, न्हाईतर एक नारळ तरी जाईलच देवी म्होरं. "

" अस्सं अस्सं. " म्हणत डॉक्टर गंभीरपणें स्वतःशींच हसले.

ठरल्याप्रमाणं शनिवारीं सकाळीं डॉक्टर हंसत हंसतच गावाच्या वेशींत शिरले. तिथंच त्याना नाना सनदी म्हशी पाण्यावर नेत असता भेटला. " नाना, लोकाना जमव हं चावडींत. टोचून टाकूं या सर्वांना. " असं त्याला सांगून ते चावडींत आले. इनामदारांच्या घरीं

त्याचा चहा झाला. गप्पाटप्पा झाल्या. अजून नाना सनदी आला नव्हता न् लोकहि जमले नव्हते. एकटा सात्या तराळ चावडींतील धुमींत शेणीचा तुकडा खुपसत बसला होता. इनामदाराच्या गड्याच्या मदतीनं त्यांनीं चावडींत स्टोव्ह वगैरे नेऊन टोचण्याची जय्यत तयारी केली न् ते बसून राहिले.

बऱ्याच वेळानं नाना आला तो दबत दबतच आला.

" काय रे, केव्हा येणार माणसं ? "

" कुणी बी यायला तैयार न्हाई जी, टोचून घ्याचं न्हाई म्हनत्यात गांवभर हिंडून आलों म्या. पर कुनी बाहिरच पडंना. "

" अस्सं ! ते कां ? "

" काल देवीचं देणं दिलंया. अन् आज परत तिच्या परवानगी-बिगर टोचून बिचून घेतलं तर तिचा कोप हुईल म्हनत्यात "

" काय मूर्ख आहेत लोक आण, आण. बोलावून तर आण त्याना. असं वेडयासारखं करूं नका म्हणावं. "

" न्हाई जी कुनी बी यायला तैयार न्हाई. इचारा कुनाला बी-"

" तुला तर आधी टोचतों तंवर चल—"

" म्या? काय म्हनता काय? न्हाईबा. देवीच्या इरुद्ध जाऊं म्हनत्यासा—न्हाई बा? " असं म्हणत तो चावडीच्या पायऱ्या उतरला. बरोबर आलेल्या सात आठ मुलाच्या अंगावर " हतं रं काय बघत्यासा" म्हणून खेकसत तो वाटेला लागला.

" कमाल झाली " असं स्वताशींच पुटपुटत डॉक्टर कुणी रस्त्यावर दिसलं तर त्याला बोलवाव म्हणून बाहेर आले. डोळ्यावर हात धरून त्यानीं पलीकडील रस्त्यावर पाहिलं लेंगा, जाकीट अन् टोपी घातलेल्या शहरी थाटाच्या पाटलाला पाहतांच त्यानीं मोठयानं ओरडून सागितलं,

" अरे, तूं मुंबईकर ना—ये इकडे—"

" काय जी—"

" काय तुमच्या गावचे लोक मूर्ख रे! कुणीहि टोचून घ्यायला तयार नाहीं तूं त्याच्यातलाच आहेस. लोकाना जमवून तर आण—"

" लोक मला ऐकतील काय साहेब—"

" बरं तूं तरी टोचून घे—ये. "

" घेतलं असतं जी पन् गावाच्या सांगण्याबाहेर कसं जायचं? अन् मी काय दोन चार दिसात जानार म्हनतों मुबईला कामावर या साथींत राहून काय उपेग? आज काय सुताराच्या आळीला उदीर पडले म्हणं "

" अरे दोन चार दिवस तरी इथं आहेस ना? मग घे टोचून. त्यांत वाईट तें काय? अं? ये बैस—" आणि थोडंसं डॉक्टरनीं समजावल्या-नंतर तो तयार झाला. आपल्या मलमलीच्या शर्टाची बाही त्यानं खांद्यापर्यंत वर नेली. आणि त्याच वेळीं गंमत म्हणून तिथं आलेलीं सात आठ पोरं कुठं पसार झालीं.

डॉक्टरनीं चिमट्यानं सुई धरून पिचकारींत बसवली. अन् लसीची कुपी हातात घेतली

" अवो दादा-ए मारत्या—" अशा गल्लीच्या तोंडाशीं आरोळया ऐकतांच ते चमकून वर पाहूं लागले.

दहाबारा गांवकरी चावडींत शिरले.

" दादा—हें काय करत्यासा तुमी—आमी त्याला टोचूं देनार न्हाई. आमी देवीची राखण बसवलीया—"

" बरं, बरं—" म्हणत डॉक्टर टोचण्याच्या तयारीला लागले

" न्हाई जी टोचूं नगसा. देवीचा कोप हुईल आम्हावर—मारत्या चल—तुला दक्कल न्हाई व्हय?"

" अरे! तो तयार आहे तर तुम्ही का मध्यें—?" डॉक्टर जरा दरडावून म्हणाले

" कोन, त्यो तयार हाय? कसा तो बघूया की. चार बुकं शिकला म्हून काय आमच्याबाहीर जातोय?"

डॉक्टर पिचकारीची सुई मारुतीच्या दंडात सरकवणार तोंच त्या लोकांची गर्दी त्या दोघांच्या अंगावर घुसली अन् डॉक्टरांच्या 'अरे अरे' च्या दरडावणीला न जुमानतां चावडींत एकच दंगल माजली.

मात्याचा शर्ट टरकला. पेटता स्टोव्ह कलंडला, त्यातलं पाणी डॉक्टरांच्या अंगावर अन् बॅगवर उसळलं अन् डॉक्टराच्या हातांतली पिचकारी खालीं पडून चक्काचूर झाली.

" चला हटा, व्हा चालते, जंगली लोक ! " डॉक्टर दोन्ही हातानं त्यांना रेटीत त्याजवर चवताळून ओरडले.

क्षणात चावडींत शुकशुकाट झाला.

डॉक्टर संतापानं थरथरत होते. फुटलेल्या पिचकारीकडे अथवा अस्ताव्यस्त झालेल्या बॅगकडे त्याच लक्ष नव्हतं ज्या बाजूनं ते लोक आले अन् पसार झाले तिकडंच त्याची नजर खिळली होती.

सात्या तराळ भीतीनं डॉक्टरकडे पाहात होता आणि जमेल तशी त्याची बॅग भरात होता. ती भरून होताच तो त्याना भीत भीत म्हणाला, " चलाव जी. "

डॉक्टरानीं तिरसटपणानं त्याजकडे पाहिल, त्याच्या हातातली बॅग हिसकावून घेतली अन् ' चल, तूंहि हो चालता ' असं म्हणत ते चावडींतून ताडकन् चालूं लागले. पाठीमागून येणाऱ्या मोत्यालाहि दगड मारून त्यानीं हाकून लावलं.

त्या लोकाच्या मूर्ख हटवादीपणाची त्याना किळस आली होती. मूर्ख जंगली लोक—याच्या नादाला पुन्हा लागायचं नाहीं. या गावात पुन्हा पाय ठेवायचा नाहीं, असा मनाशीं पावलागणिक निश्चय करीत ते चालले होते.

आणि हा निश्चय मनापासून ते पाळत होते. दूध घेऊन येणाऱ्या रामाबरोबर ते चकार शब्द बोलत नसत. गुरुवारीं बाजाराला आलेले लोक नेहमींप्रमाणें त्यांच्या घरीं येत. आणि डॉक्टर खोलींत कामांत गुंतलेले पाहून बाईच्याबरोबर बोलून निघून जात. तसाच कोणी धाडस करून ' कसं काय दादा ! ' करून आला कीं ते करड्या स्वरानं म्हणत, ' काय काम आहे माझ्याकडे-मला आता सवड नाहीं बोलायला. ' आणि त्याला वाटेला लावीत. डॉक्टरीणबाई त्यांना कधीं सागायला जात-'अहो, आज तो आमका आला होता न् म्हणत होता–

पुढचं वाक्य त्याचं अर्धंच राही, कारण एकदम डॉक्टर ओरडून म्हणत, ' काहीं सागूं नको मला त्यांच्याबद्दल—जंगली आहेत ते. ' आणि तो विषय तेवढाच राही.

त्यांतच निपाणींत विषारी तापाची साथ भयंकर फैलावली आणि त्या गडबडींत डॉक्टर त्या चिमुकल्या गावाला आणि त्यांतल्या जंगली लोकाना पूर्ण विसरून गेले.

डॉक्टरांना कुणाकडे तरी रोगी पाहायला जायचं होतं. बोलावणं तातडीचं होतं कपडे करून अन् बॅग भरून ते तयार होते. आतून येणाऱ्या चहाला उशीर होत होता म्हणून त्याच मन अस्वस्थ होत होतं. उशीर सहन न होऊन त्यांनीं पत्नीला हाकारलं. आणि ती तशीच बाहेर येताच त्यांनीं प्रश्नार्थक नजरेनं तिच्याकडे पाहिलं.

" काय करावं, रामा अजून दूध घेऊन आला नाहीं " तिनं काळजीच्या स्वरात सागितलं.

" आस्सं- " अस म्हणून डांक्टरानीं बॅग उचलली अन् ते चालूं लागले.

पण मग जेवतेवेळीं " रामा तर आला नाहीच, पण दुसंर कुणीहि दूध घेऊन आलं नाहीं, " असं जेव्हा त्याना कळलं, तेव्हा हातात घेतलेला घास त्यांच्या हातातच राहिला आणि घशांतला घशातच घोटाळूं लागला. पाण्याचा एक घोट घेऊन जेवण चालू करीत ते म्हणाले, " जंगली लोक आहेत झालं ! "

मग गुरुवारच्या दिवसापर्यंत त्यांना तिकडची काहीं हकीगत कळली नाहीं. रामा दूध घेऊन येत नव्हताच पण त्याकारिता त्याना थांबता येत नव्हतं. कारण नुकत्याच माहेरीं आलेल्या त्याच्या एकुलत्या एक मुलीला दोन दिवसांपासून तापानं पछाडलं होत. ताप एकशेंचारबर होता आणि डॉक्टर त्याच काळजींत होते.

बाजाराकरितां कुणी गांवाकडून आलं आहे अन् तें त्यांना भेटूं इच्छित आहे असं जेव्हां कळलं, तेव्हां ते मुलीच्या बिछान्याजवळच

बसले होते. निरोप घेऊन येणाराला ते म्हणाले, " मला कशाला भेटायचंय ? त्याची काहीं गरज नाहीं. जा साग त्याला." अन् आपल्या मुलीकडे वळून ते प्रेमळपणानें म्हणाले, " कसं वाटतंय राजा ? "

तेव्हा तापानं मुसमुसलेल्या तिच्या चेहऱ्यावर हसूं उमटलं. ती म्हणाली, " बरं वाटतंय. तुम्ही सारखे आहात ना बसून मजजवळ ! "

हे तिचे उद्गार ऐकताच डॉक्टराना काय वाटलं कुणास ठाऊक, ते ताडकन् बाहेर आले अन् गावाकडून जें कोण आल होतं त्याची विचारपूस करूं लागले

तेव्हां त्याना कळलं कीं, रामा प्लेगला बळी पडला त्याची बायको अन् थोरला मुलगाहि आजारी आहेत. गावांत तर बदाबद उंदीर पडूं लागले आहेत कुजलेल्या उंदराच्या दर्पानं गल्लीन्‌गल्ली कोंदून गेली आहे इनामदार तर गांव सोडून केव्हांच गेले होते आणि आतां लोकहि भराभर गावाबाहेर पडत आहेत पण शेतात पिकं उभीं असल्यानं झोंपड्या तरी घालायच्या कुठे ? गावात रहावं तर लोक पटापट मरत आहेत. मग लोकानीं धीर करून पिक कापून खोपींना जागा तयार केली आहे अन् कशाबशा खोपी तयार करून लोक तेथ रहायला गेले आहेत. गणपति जवळ आलेला मधूनच धो धो पाऊस कोसळतो आहे शेतातल्याच खोपी त्या–त्यात गुडघा गुडघा चिखल होत आहे, चूल पेटवता येत नाहीं. रात्रीं चिखलावर कडब्याच्या पेंड्या पसरून त्यावर वाकळा पसराव्या लागतात. तरी पण कोरडी जागा मिळते काय ?–छे ! अशा स्थितींत झोपडींत तरी कुठलं आरोग्य असणार ? मुलं तापखोकल्यानं झपाटलीं आहेत, काहीं मरायलाहि पडलीं आहेत. आणि आता प्लेग तिथंहि माग काढीत आला आहे !

ही सगळी हकीगत सागून त्या माणसानं डॉक्टरांच्या पायाला हात लावला आणि डोळयात पाणी आणून सांगितलं,

" दादा, तुम्हींच आतां आम्हाला वाचवा. "

डॉक्टरानीं एक सुस्कारा टाकला अन् हंसून म्हणाले, " मी कोण बाबा तुम्हाला तारणार ? "

" अस म्हनु नका जी ! " तो म्हातारा कळवळून म्हणाला

" मी कुठं म्हणतोंय् ? तुम्हीच तें बोलून चुकला आहां. तुमची देवी तुम्हाला तारणार ! मी कोण ? मी एक मनुष्य ! "

" नका नका जी, असं म्हनु नगा. तुम्ही आमाला लोटलं तर-" अस म्हणत तो पुन्हा डॉक्टराच्या पायाला हात लावूं लागला. पण आपले पाय चटकन् बाजूला घेऊन उठत डॉक्टर म्हणाले, " मीं तुम्हाला लोटल ! वा, तुम्हीच मला—पण जाऊं द्या. माझी मुलगीच घरात आजारी आहे. मला कुणाचाच विचार करावयाला सवड नाहीं."

अस म्हणून डॉक्टर घरात निघून गेले.

मुलीचा ताप वाढेल अशीं लक्षणं दिसत होतीं डॉक्टर सारखे तिच्या जवळ बसून होते एक वाजला तरी स्नान-जेवण त्याना सुचलच नव्हतं. एक वाजतां डॉक्टरांनीं ताप पाहिला, तेव्हा डोळे उघडून मुलीनं विचारलं " नाना, अजून जेवला नाहीं तुम्ही ? इश्श, इतकं मजजवळ बसायची जरूर नाहीं. मला बरं आहे. जेवा तुम्ही. तुम्हीं जेवला नाहींत तर मला चैन पडणार नाहीं. "

" बर " म्हणून डॉक्टर जेवायला उठले पण घास घशाखालीं उतरेना. मग त्यांनीं तो प्रयत्न आटोपता घेतला.

डॉक्टर मुलीजवळच होते. पण त्याचं मन भयंकर बेचैन झालं होतं. पलगाजवळच्या खुर्चीत ते बसत, पण लगेच उठत, फेऱ्या घालू लागत. पुन्हा पलंगाशीं येत, मुलीच्या कपाळावरून हात फिरवीत, पुन्हा फेऱ्या घालूं लागत. काहीं केल्या त्यांचं मन सुस्थिर होत नव्हतं. त्यातच मुलीचा ताप हळूहळू वाढत होता. मुलीची तळमळहि सुरू झाली होती. त्यामुळें डॉक्टराची अस्वस्थताहि वाढत होती. त्याच इलाज करण चालू होतं, पण त्यामुळं गुणहि येत नव्हता आणि उपचार केल्याच समाधानहि त्याना लाभत नव्हतं. चार वाजले, पाच वाजले, साडेपाच झाले, ताप वाढत होता अन् मुलीची घालमेलाहि वाढत होती. पण मुलीच्या स्थिती-

पेक्षा नवऱ्याच्या अस्वस्थतेनंच डॉक्टरांच्या पत्नी घाबरल्या होत्या. साडेपांचच्या सुमाराला त्यानीं घाबरून विचारलं, " उतार पडत नाहीं तर काय करायचं आता ? "

" काय करायचं ! " डॉक्टरांनीं एक सुस्कारा टाकला

" मग–" डॉक्टराच्या पत्नी अडखळल्या.

" मग काय ? "

" मिशनच्या डॉक्टरला बोलावणार ? "

डॉक्टरानीं एकदां पत्नीकडे अन् मुलीकडे पाहिलं आणि 'हं' म्हटलं.

मिशनच्या युरोपिअन डॉक्टरकडे त्यानीं तातडीनं येऊन जा म्हणून चिठी पाठविली आणि त्यांच्या येण्याची वाट पाहात ते सोप्यावरच येरझाऱ्या करीत राहिले. डॉक्टरला येण्यास वेळ लागूं लागला तसतशी त्यांच्या जीवाची उलघाल होऊं लागली आणि डॉक्टरांनीं परत पाठविलेली चिठी त्यानीं जेव्हा वाचली, तेव्हा तर त्यांच्या काळजात जें काय झालं त्याचं वर्णन करणं कठीण.

त्या डॉक्टरनं लिहिलं होतं, " आताच दोन युरोपिअन रुग्ण आले आहेत. त्याची व्यवस्था लावली पाहिजे मला. आताच येता येत नाहीं त्याबद्दल वाईट वाटते. सवड होताच येतो ! "

डॉक्टरानीं ती चिठी भिरकावून दिली. आणि एका तिरमिरींत ते खोलींत शिरले. त्याना काय होत होत तें त्याना कळत नव्हत. ते मुलीजवळ जाऊन उभे राहिले. मुलीचा हात त्यानीं हातांत धरला, पण त्याची शुद्ध त्याना नव्हती. खिडकींतून दूर कुठं तरी ते पाहात होते.

मुलीची तळमळ वाढत होती, तळमळतच तिनं हाक मारली, " नाना ! "

झोपेतून खडबडून जागं व्हावं तसं डॉक्टरानीं केलं. ते डोळे विस्फारून पाहूं लागले. मुलीनंच त्यांना हाक मारली होती. पण तो तिचा आवाज त्याना वाटत नव्हता

आणि पुन्हा जेव्हां तिनं " नाना " म्हणून त्यांना बोलावलं तेव्हा तर त्याची त्याबद्दल खात्री झाली कारण तो तिचा आवाज नव्हता, येवढंच नव्हे तर तो एकच आवाज नव्हता. त्यांत हजारों आवाज मिसळले आहेत असं त्याना वाटलं. बायका-मुलं, म्हातारीं माणसं याचा एकच आक्रोश कानावर यावा तस त्याना वाटलं त्यांनीं दोन्ही हातानीं आपलं डोकं गच्च दाबून धरलं, एक निश्वास सोडला आणि त्याच्या मनाची अस्वस्थता एकदम दूर झाली. त्याच्या मनाचा निश्चय झाला. त्यानीं पलीकडच्या गल्लींतल्या डॉक्टर मित्राला बोलावण पाठवल. तो येताच त्यानीं आपल्या मुलीची केस त्याला समजावून सागितली अन् विचारलं, " मला एक वचन दिलं पाहिजे तुम्हीं. "

" कोणतं ? " त्यानं विचारलं

" इथं, रात्रभर हिच्याजवळ राहण्याचं. "

" म्हणजे ! तुम्ही कुठें जाणार कीं काय ? " आश्चर्यानं स्तंभित होऊन डॉक्टर मित्रानं विचारलं.

शातपणें डॉक्टर म्हणाले, " होय. हिचा ताप आणि तळमळ वाढली आहे खरी. पण बाकी हिचं सर्व चांगलं आहे. तुम्ही जवळ असला, म्हणजे मला काळजी नाहीं. पण—"

त्याना पुढें बोलूं न देतां त्याच्या पत्नीनं हताशपणानं विचारलं, " तुम्ही हिला असं सोडून जाणार ? नाहीं, मी नाहीं–"

पण डॉक्टरांनीं पत्नीचं अन् कुणाचंच ऐकलं नाहीं. त्यांनीं आपली झटपट तयारी केली अन् ती होताच मुलीच्या खोलींत येऊन त्यांनीं तिला एकदा प्रेमळपणान हाक मारली. अन् तिनं एकदा डोळे उघडून हंसत पाहताच ते घरांतून सटकले.

संध्याकाळ झाल्यानं स्टँडवरच्या मोटारी अन् टांगे निघून गेले होते. डॉक्टर आपली बॅग सावरीत रस्त्यानें पुढें चालू लागले.

एक फर्लांगभर जाताच त्याचं लक्ष समोरच्या डोंगराकडे गेलं. डोंगरावर वसलेलं तें चिमुकलं गाव, पसरलेल्या अंधारात बुडतांच्या

गटंगळया खाताना, हात वर करून आक्रोश करणाऱ्या लहान मुला-सारखं त्यांना दिसलं.

त्यामुळें निर्मनुष्य आणि अंधारत जाणाऱ्या अशा त्या वाटेवर त्यांचीं पावलं अधिकच झपाट्यानं पडूं लागली.



## तडजोड

८

बँडच्या उन्मादक आणि मधुर घोषात ' सुमुहूर्ते सावधान ' होऊन बराच वेळ होऊन गेला होता लग्नासाठी आलेलीं बहुतेक माणसं परतलीं होतीं घरची पुरुषमंडळीहि आपापल्या पुढील उद्योगाला लागली होती. बायका आपल्याच गडबडींत इकडून तिकडे वावरत होत्या होमाजवळ फक्त वधुवर व त्याचे निवडक मित्र याचाच तळ दिसत होता. वधूभोवतीं मुलींचं कोंडाळं जमलं होतं. त्याच्या दागिन्याच्या आणि पातळांच्या गोष्टी चालल्या होत्या.

" रेवा, ए रेवा, यांनीं तुझं पत्र फोडलं बघ " दुसऱ्या कोंडाळ्यांतून एकदम कोणीतरी मोठ्यानं बोलल आणि खूप मोठ्यानं हंसलं.

रेवती चटकन् उठली. नववधूच्या शृंगारानं ती सजलीच होती. नुकताच गळ्यांत घातलेला हारहि तिनं अद्याप काढला नव्हता.

" कोणीं फोडलं—" लगबगीनं ती तिकडे गेली. रेशमी सळसळती साडी सावरताना आणि गळ्यातील हार आवरून धरताना तिची कोण धांदल उडाली होती ! ती जवळ येतांच पाच सहा तरुण दूर झाले.

" कोणी म्हणजे ? आता दुसरं कोण-? " कुणीतरी म्हणाल.

तिचा धाकटा भाऊ हातात एक निळी कागदाची घडी घेऊन बसला होता.

" कोणी म्हणजे, यानीं—तुझ्या यानीं. मीं त्यांना सांगितलं, आमच्या रेवाताईला आपलीं पत्रं दुसऱ्यांनीं वाचलेलीं आवडत नाहींत-ती रागावते-आणि काढून घेतलं त्याच्याकडून—"

तिन चटकन् तें त्याच्या हातातून घेतलं.

" पण तें इथं तुमच्याकडे कसं आलं ? "

" अग मिसेस कुलकर्णी म्हणून आलं आणि याना वाटलं तें आपलंच—"

" मला कुठं अजून मिसेसना अशीं पत्र यायची संवय आहे ? " रघुनाथ हंसत म्हणाला.

" पण आहे तरी काय त्यात पाहूं तरी ? प्रो. देशपाड्यांचं दिसतं-'

" हो, हो. त्यांचंच-" असं म्हणून रेवा चटकन् तिथून निसटली आणि मैत्रिणींच्या घोळक्याकडेहि न वळता दाराबाहेर गेली. उत्सुकतेनं तिनं घडी उलगडली. चारच ओळी त्यात होत्या—

'प्रिय रेवा,

वैवाहिक जीवन ही एक आयुष्यांतील तडजोड आहे हें नेहमीं लक्षात ठेव. ही तडजोड सुखद ठरणं किंवा दुःखद ठरणं हें मात्र पूर्णपणे अदृष्टाच्या स्वाधीन आहे निदान माझा तरी तसा पूर्ण विश्वास आहे.

—शांताराम.'

तिनं दोनदां तीनदा तें एवढंसं पत्र वाचलं. आनंदाच्या प्रसंगींहि ह्यांना आपल्या मनातील उदासीनता दूर करता येत नसावी याचं तिला आश्चर्य वाटलं. क्षणभर शांतारामसंबंधींच्या सर्व भावना एकवटून आल्या आणि तिचा चेहरा कोमेजून गेला.

ती परत आली तेव्हा रघुनाथ तिच्याकडे पाहातच होता तिच्या चेहऱ्यावरील मलूलता लक्षांत येऊनच त्यानं म्हटलं असावं—

" रेवती, पाहू तरी काय लिहिलंय त्यानीं."

" मी सांगतों काय लिहिलंय तें. ' या वर्षी आनंदी आनंद आणि पुढच्या वर्षी तिसरा आनद ' " कोणीतरी म्हणालं आणि मग जो हास्याचा कल्लोळ उडाला त्यांत रेवती तेथून घरात केव्हा गेली हें कुणाला समजलंच नाहीं.

" आई, माझं डोकं दुखतंय ग " असं सागून ती त्यांतल्या त्यात निवात अशी जी खोली होती त्यांत जाऊन आडवी झाली.

रघुनाथनं दोनदा तिला पत्राविषयीं विचारल होतं, त्याचंाच तिला चीड आल्यासारखी झाली होती. पुन्हां आपण त्याच्या दृष्टीस पडलों कीं पुन्हा तो चौकशी केल्याखेरीज राहणार नाहीं हा तिला धसकाच बसल्यासारखा झाला.

अजून ओळख नाहीं, काहीं नाहीं, तोंच त्यानं इतका हक्क दाखवावा याच तिला नवल वाटलं. आणि सकाळपासून त्याच्याविषयींची जी एक गोष्ट ती मनांतून काढून टाकूं पाहात होती तीच पुन· तीव्रतेनं तिच्या मनांत घोळूं लागली

सकाळीं काहीं धार्मिक विधीकरता प्रथमच तीं दोघंजणं एकत्र आलीं. आठ दिवसांपूर्वी रघुनाथ तिला पाहायला आला होता तो अगदीं उंची सुटात त्याच्या रुबाबावर ती खूष होती. त्यानतरच्या गडबडींत तो तिच्या पुन्हा दृष्टीस पडला नव्हता. आणि आतां ती त्याला किती वेगळ्या पोषाखात पाहात होती. किंचित् बोंगा झालेलं कोरं धोतर, जरीकाठी उपरणं, कपाळाला भुंवईच्या मधोमध रेखलेल उभं कुंकूं—खरंच रघुनाथ किती छान दिसतो या कल्पनेनं हुरळून जाऊन तिनं त्याच्याकडे डोळे भरून पाहिलं होतं आणि एकदम तिच्या अंगावर शहारे आल्यासारखे झाले होते.

त्याच्या छातीवरील केसाचीं दाट नाजूक वलयं गळ्यापर्यंत येऊन पोंचलीं होतीं, आणि आता उपरण्यातून तीं डोकावून पाहात होतीं. तिला जें नको होतं—ज्याचा तिला किळस वाटत होता तेंच ती पाहात होती.

" इSS—पुरुषाची जातच मेली ओंगळ " असं कांहीं ती मनांतल्या मनांत कुजबुजली आणि आत खोल कुठं तरी तिला दुखावल्यासारखं वाटलं. नतर तिच्या इच्छेविरुद्ध सारखी तिची नजर त्यांच्या गळ्यापासच्या भागावर जात होती. आणि अंगावर पडलेलं झुरळ झाडून टाकावं तितक्याच तीव्रतेनं ती तो विचार आणि तें दृश्य मनावेगळं करत होती.

आता हा गृहस्थ पत्राची चौकशी करत होता–तिच्या वडिलांनीं किंवा आईनेंहि कधीं असा आग्रह धरला नव्हता.

“ आई, मी जातें ग ” असं तिनं सांगितलं कीं तिच्या आईनं तिला “ कुठं जाणार ? केव्हा येणार ? काय काम आहे––” अशा प्रश्नानीं कधींच बेजार केलं नव्हतं. आणि म्हणूनच तिला आता रघुनाथचं हें वागणं आवडलं नव्हतं या विचारातून तिला एक तीव्र जाणीव झाली. “ खरंच आजपासून माझं–माझं स्वत·चं असं काहींच राहणार नाहीं—” आणि नकळत तिच्या डोळ्यातून दोन आंसवं गळालीं.

पत्रांत तरी न दाखवण्यासारखं असं काय होतं ? आणि आवर्जून त्याला दाखवावं असं तरी काय होतं ? त्या पत्रामागील तिच्या भावना त्याला थोड्याच समजणार होत्या ? पत्र दाखवायचं आणि खोटा निरागसपणा दाखवायचा–आणि प्रत्येक बाबतींत असंच यापुढें वागावं लागणार–

रेवाचं डोकं दुखत आहे ही बातमी माडवापासून तों परसातल्या मोलकरणीपर्यन्त पसरायला वेळ लागला नाहीं.

भराभर तिच्या मैत्रिणी गोळा झाल्या. तिच्या सासरचीं चारपाच माणसंहि चौकशी करून गेलीं कुणी छोटा मुलगा त्याच गर्दीतून रेवा-जवळ आला आणि म्हणाला,

“ रघुनाथमामांनीं हें घ्यायला सांगितलंय–” एक अॅस्प्रोचं पाकीट तिच्या हातात टाकून तो लाजत पळून गेला. रघुनाथच्या या अगत्यानं तिचं मन फुललं. पण क्षणिकच.

ती रघुनाथबरोबर आपल्या घरीं निघाली. तेव्हां तिच्या आईच्या डोळ्यांत पाणी आलं. बाहेर मोटर उभी होती. गाडीची वेळ होत आली होती. तरी रेवतीचा पाय निघण्यासाठीं उचलत नव्हता.

तिची आई डोळ्याला पदर लावून रघुनाथाच्या थोरल्या भावजयीला म्हणाली,

"ताई, आजवर मीं मुलाप्रमाणं वागवली माझ्या रेवाला. तिला संभाळून ध्या काहीं चुकलंमाकलं नीट समजावून सागा–तशी अगदीं हाडाची गरीब आहे हो ती."

पूर्वी मुली लहान होत्या म्हणून त्याची आई सागे, 'माझ्या मुलीला संभाळा.' आता पंचविशी उलटलेल्या बी.ए, एम् ए झालेल्या मुलींची आईहि तसंच सागते. आईची माया वेडी म्हणतात तें काहीं खोटं नाहीं. रघुनाथला वाटलं तो काहीं बोलणार तोंच त्याची भावजय म्हणाली–

"अहो, त्या आता आमच्याजवळ थोड्याच राहाणार आहेत—आणि राहिल्या तरी आम्हींच त्याना सभाळून राहिलं पाहिजे–आम्ही काय अडाणी–" मोठा विनोद केल्याचा आव आणून ती मोठ्यानं खेकाळत हंसली.

"आईची भावना आणि जावेचा विनोद–काय मूर्ख आहे ही बाई.' रेवा डोळे पुसत मनाशीं म्हणाली.

"हं, चला चला जाऊबाई इतकीं वर्षं माहेरी काढून अजून कसा बाई पाय निघत नाहीं–"

"असंगाशी संग आणि प्राणाशीं गाठ–" रेवानं चिडलेल्या चेहऱ्या-नंच मोटारच्या फुटबोर्डवर पाय ठेवला. त्या परिस्थितींत आईचा निरोप घेण्याचंहि तिला भान राहिल नाहीं.

तो उन्हाळ्यातील सबंध दिवस त्याना आगगाडींतच घालवायचा होता रघुनाथचीं सगळीं माणसं एका कंपार्टमेंटमधेंच बसलीं होतीं. गाडी सुरू होताच रघुनाथनं पत्ते काढले. मुलानीं रडं सुरू केलं, आणि बायकानीं लग्नातल्या गोष्टी मोठमोठ्यानं बोलायला सुरवात केली. अमूक एका प्रसंगीं नवऱ्यामुलीच्या आईचं कसं चुकल, आणि आपण समजूत-दार माणसं म्हणून तो प्रसंग कसा निभावून नेला अशी ती रसाळ चर्चा चालली होती बिचारी रेवती खिडकीशीं बसून तें सारं पाहात होती आणि ऐकत होती. तिच्या माहेरच्या माणसांना वाटेल तशीं नांवं ठेवलीं जात होतीं. आणि तीं तिला निमूटपणें ऐकून घेणं भाग होतं. फाडकन कांहीं उत्तर देऊन त्यांचीं तोंडं बंद करावीं असं तिला एकदां वाटलं.

तिनं रघुनाथकडे पाहिलं आणि आवंढा गिळल्यासारखा केला. त्यांचा ब्रिजचा डाव रंगात आला होता. रेवतीच्या मनःस्थितीची त्याला कल्पना तरी होती कीं नाहीं कुणाला ठाऊक

दर स्टेशनवर गाडी उभी राहिली कीं, रघुनाथनं कांहींतरी खायला घ्यावच. काय तरी खाण्याचा सोस. आणि रेवतीलाहि खूप आग्रह करावा.

" अग, या स्टेशनवर केळीं फार छान असतात—आम्ही सर्वजण खातों. तूं एक तरी खाल्लंच पाहिजे. घे घे "

दर स्टेशनवरच्या या आवृत्तीची तिला उबग आली हे बिझिनेस-मधले लोक असंच उथळपणानं वागत असतात काय ? तिच्या मनापुढें प्रश्न उभा राहिला

' खरंच, या रघुनाथच्या देखणेपणापलीकडे याची एकहि गोष्ट मला पटत नाहीं असं का होतं आहे ? माझंच कुठंतरी चुकतं आहे का ? का खरोखर तशी परिस्थिति आहे ? ' असे विचार तिच्या मनात आले आणि तिच्या घशाला कोरड पडली.

तिला वाटलं होत. रघुनाथ आपल्याजवळ अगदीं जवळ बसेल. आणि आपल्याशींच सारखा बोलत राहील काळ्याभोर जमिनी, पिवळीं धमक शेतं, उंच उंच पर्वत, खोल खोल दऱ्या–नद्यांचे मोठे मोठे पूल असं काहीं खिडकींतून दिसूं लागलं कीं तिनं म्हटलं असतं,

" बघा तरी–किती छान–किती सुंदर देखावा " आणि असं म्हणत असताना त्याच्या दंडाला तिन स्पर्श केला असता आणि अननुभूत असं सुख अनुभवलं असतं.

मग त्यानं गोड हंसून म्हटलं असतं,

" छे, छे ! बाहेर काय सुंदर देखावा लागून गेला आहे ! सुंदर देखावा आहे तो खिडकीपाशींच आहे. "

आणि मग तिनं सर्वांना न कळत त्याला एक चिमटा घेतला असता.

असं त्यानं म्हणावं अशी खरींच ती सुस्वरूप होती. ऐन तारुण्यातील अल्लड असं तें सौंदर्य नव्हतं. त्यांत प्रौढपणाची झांक होती. आणि म्हणूनच

त्या सौंदर्यांत एक प्रकारचा समजूतदारपणा आला होता. अशा तिच्या रूपाची अजून त्यानं दखल घेतली नसावी, याचं तिला नवल वाटत होतं.

पण हें सगळं तिच्या मनातील रघुनाथनं केलं असतं. खरा रघुनाथ तिच्यापासून दूर–पुरुषात बसला होता हिच्याशीं बोललं पाहिजे हें त्याला माहीतहि झालं नव्हतं.

अशी ती हिरमुसलेल्या मनःस्थितींत असतानाच त्याचा प्रवास संपला.सर्व वऱ्हाड आपल्या घरीं आलं सर्वांचीं घरचीं काम सुरू झालीं. इथं त्याना दोन दिवस राहायचं होतं. लग्नाची सत्यनारायणाची पूजा व्हायची होती आणि तिसरे दिवशीं सकाळीं रघुनाथ पत्नीसह आपल्या धंद्याच्या गावीं जाणार होता.

पहिला दिवस प्रवासाच्या शिणांत गेला. त्या दिवशीं जेवणाव्यतिरिक्त रघुनाथ तिच्या दृष्टीस पडलाच नाहीं. दुसरा दिवस जावेबरोबर घरं हिंडण्यात गेला. थोरल्या जाऊबाईंनीं आपली धाकटी जाऊ सर्वांना दाखवून आणली, त्याच वेळीं सत्यनारायणाचंहि निमंत्रण दिलं. सध्याकाळ होईपर्यंत बायकाच्या कोंडाळयातून तिची सुटकाच झाली नाहीं.

पोराचीं रडणी, कोऱ्या लुगड्याचा वास, संसारातल्या बाष्कळ गप्पा, नवऱ्याचीं कौतुकं, तिला वीट आला या साऱ्यांचा. आणि वधुवरावरून त्या बोलायला लागल्या कीं तिचा चेहरा घामानं थबथबून जाई बायका इतकं अश्लील बोलूं शकतात हें तिला आता प्रथमच कळत होत. अशी ती गागरलेली असतानाच एक मुलगी दाराशीं येऊन उभी राहून मोठ्यानं म्हणाली,

"रेवतीकाकू, तुला नाथकाका बोलावताहेत. तुझं सगळं सामान घेऊन ये म्हणून सांगितलं आहे बॅग भरायची आहे म्हणे."

"भाऊजींनीं अगदीं खासं निमित्त काढलेलं दिसतंय बायकोची गांठ घ्यायला—' तिच्या जाऊबाई हात नाचवीत मोठ्यानं हंसल्या. इतर

बायकांनींहि पुस्ती जोडली आणि हंशाचा एक धबधबाच निर्माण झाला.

रेवती झटकन् उठली भिंतीशीं ठेवलेलं माहेरून आणलेलं सामान तिनं आपल्या बॅगमधें दडपलं आणि ती बॅग घेऊन सरळ रघुनाथकडे गेली. पण रघुनाथ एकटा नव्हता. तिथंच एक मुलगेलासा तरुण काहीं वाचत बसला होता पण हिला दाराशी पाहताच संकोचानं म्हणा किंवा समजून म्हणा तो पुस्तक तिथंच टाकून बाहेर निघून गेला.

'या साऱ्या घरात हा एकटाच शहाणा दिसतो' असं मनाशी म्हणत रेवतीनं आपली बॅग रघुनाथाच्या स्वाधीन केली.

मिनिटभर दोघंहि स्वस्थच होतीं काय बोलावं तें कुणालाच कळेना. बॅगेचं झांकण धरलेला रघुनाथचा हात थरथरत होता तें रेवतीला स्पष्टपणें दिसत होतं.

"उद्या सकाळीं जायचंय् आपल्याला—" त्याचा आवाज किंचित् घोगरा आला.

"हं"

"तुझीं पातळंबितळ टाक या ट्रंकेत"

ती ट्रंक लावण्यास खालीं बसली. हें असंच का असतं पतिपत्नीचं पहिलं भाषण?

ट्रंकेत आपले सूट ठेवण्यासाठीं तो तिच्याजवळ सरकला.

तिनं चटकन् नाक चढवल्यासारखं केलं.

"इश्श-तपकीर ओढता वाटतं?"

"हो. का-"

"नाहीं, वास भरला कपाळात—"

"आता तुला संवय करून घेतली पाहिजे."

"मला नाहीं आवडत—"

"पण मला आवडते ना—" त्यानं एकदम तिला जवळ घेतलं.

"हें काय?" तिनं एकदम दूर होण्याचा प्रयत्न केला. 'हा काय रानटीपणा मेला'—तिचं अंतर्मन खवळलं.

पण तिला दूर होतां आलं नाहीं. तिनं डोळे मिटले तिचा चेहरा लालबुद पडला. घामानं तिचं कपाळ डबडबून आलं. मन सारखं थरथरत होतं आणि त्या थरथरणाऱ्या मनातून चित्रं भराभर सरकून जात होतीं—क्षणात तिला शांताराम दिसला. लगेच तिला पाहायला आलेला रघुनाथ तिच्यापुढें उभा राहिला—तीं केसांचीं वलयं आणि तो आताचा रानवट दांडगेपणा—कांहींच सहन न होऊन असहायपणानं तिनं त्याच्या खांद्यावर मस्तक टेकलं. तपकिरीचा दर्प नाकात भरत होता. आणि आत आत—मन विव्हळत होतं—

" देवा, देवा, तडजोड, तडजोड ती हीच का रे."



# कठीण ग बाई! ९

" फट् फट् फट् "—

फटफटी मोटारचा आवाज ऐकूं येतांच हातातला खेळ सोडून भाली बाहेर आली. भालीची आत्या दाराशींच उभी होती.

" आत्या, कोण ग तो–फट् फट् फट् "—

" तो होय ? त्याला म्हणायचं माकड " उषानं कपाळाला आठ्या घालीत म्हटलं.

उषाची फिरायला निघण्याची वेळ झाली कीं त्या फटफटीचा मालक रोज अशाच फेऱ्या घाली त्याच्यावर चिडूनच ती असं म्हणाली होती.

" आत्या! माकड कधीं मोटारीवर बसत होय? तें काय सर्कशींतलं माकड आहे काय?" हंसत हंसत भाली म्हणाली. असं म्हणत असताच तिनं रस्त्यावर बोट दाखवलं.

" आत्या, आत्या, तें बघ आता एक माकड सायकल चालवतंय ".

" भाले–चल उगीच बोलूं नको कांहीं–असं म्हणूं नये हं वाटेल त्याला "–उषानं तिला जवळ घेतलं. तिचं बोट धरून उषा हळूं फाटका-बाहेर पडली. तिथून ती मैत्रिणीकडे जाणार होती आणि पुढें फिरायला त्या दोघी मिळून निघणार होत्या. दुसऱ्या गल्लीशीं वळताच पुनः ती फटफटी मोटार भालीला दिसली. तिनं आत्यानं धरलेलं बोट चटकन् सोडवून घेतलं, आणि रस्त्यातच टाळ्या पिटत ती नाचूं लागली.

" माकडा, माकडा, हूप! "

" झाले–झाले–कठीण ग बाई !" उषानं एका हातानं तिचं तोंड दाबून धरलं.

उषाच्या घरांतील प्रत्येक जण दिवसांतून पंचवीसदा तरी त्या छोट्या भारतीला म्हणे " कठीण ग बाई ! " चवथं वर्ष देखील अजून पुरं झालं नव्हतं पण अशी बोलकी, अशी हुशार आणि अशी खट्याळ ! उषाचा दादा जितका अबोल तितकीच ती बडबडी. आणि उषाची वैनी जितकी साधी, तितकीच ती लबाड होती ! उषाची ती अतिशय लाडकी कॉलेजची वेळ सोडून ती नेहमीं उषाभोवतीं घुटमळत असे. उषा म्हणजे प्रत्येक बाबतींत तिचा आदर्श होता. तिची आई तिला आपल्या समजुतीप्रमाणे नटवायला पाही. पण त्या चिमुरडीला तें खपायचं नाहीं. " मला आत्यासारखं कुंकूं लाव. मला आत्यासारखं फूल घाल. " असा तिचा रुसवा चाले आईलाहि ती म्हणे—

" निन्नी, असं मोठ्ठं मोठ्ठं पातळ नको नेसूं आत्यासारखं नेस. "

काळया रंगाचा तिला विलक्षण तिटकारा. तिचा काका काळा होता, म्हणून ती त्याच्याकडे जायला नाखूष असे. त्यानं कधीं जवळ घेऊन तिचा पापा घेतला, कीं आपला गाल चोळून ती लालबुंद करून टाकी आणि मुसमुसत कोपऱ्यात जाऊन उभी राही. कुणी विचारलं तर म्हणे,

" काकानं काळा रंग लावला माझ्या गालाला–शी ! "—

एकदा तिच्या निन्नीकडे कुणी बाई बसायला आल्या होत्या. झालीची सारखी भुणभुण सुरू होती.

" निन्नी, तूं इथं बसूं नको. " आईला ती चार शब्द बोलूं म्हणून देईना. शेवटीं त्रासून निन्नीनं विचारलं,

" अग, तुझं काय जातं मी बसलें तर ! "

" ही काळी आहे. तूं होशील कीं "–तिनं त्या बाईकडे मारक्या म्हशीसारखं पाहात सांगितलं. वैनीला शरमल्यासारखं झालं. पाहुण्याबाई म्हणाल्या,

" कठीण ग बाई, तुझ्या लेकीपुढें ! "

या बडबडया आणि फटकळ मुलीनं उषाच्या जीवनांत केवढा बदल घडवून आणला हें कुणाला सांगितलं तरी खरं वाटलं नसतं. त्याचं असं झालं—

त्या दिवशीं गंधर्वाचं स्वयंवर नाटक लागलं होतं उषानं अजून गंधर्वाचं काम पाहिलं नव्हतं; आणि पाहायची फार उत्सुकता होती. जेवतेवेळीं तिनं नाटकाला जाण्याची गोष्ट काढताच दादानं अंगावर शहारे आल्यासारखं केलं होतं आणि वैनीनं त्याचा अभिनय लक्षांत घेऊन म्हटलं होतं—

" शी ग बाई ! नाटक पाहण्यापेक्षां डोळे मिटूनच बसावं लागेल तिथं "

पण तें उषाला पटलं नव्हत. तिनं ' मखमालीचा पडदा ' हें पुस्तक अभ्यासातील संदर्भाचं पुस्तक म्हणून वाचलं होतं. " अखेरचें बंड " ही फडक्याची कादंबरी लायब्ररींतून आणून नुकतीच वाचून संपविली होती. गंधर्वाबद्दल त्याला न पाहताच तिच्या मनात अभिमान उत्पन्न झाला होता. शेवटीं तिनं एकटीनंच नाटकाला जायचं ठरलं. अर्थात् भाली बरोबर जाणारच होती

नाटकाचा कुठला तरी प्रवेश चालला होता. ' रुक्मिणी ' एकटीच गात होती. उषा तें गाणं ऐकण्यात तल्लीन होऊन गेली होती. आणि भाली काय मनात येऊन कुणास ठाऊक, सारखा तिच्या गालाला हात लावून तिचं लक्ष आपल्याकडे ओढून घेण्याचा प्रयत्न करीत होती.

" आत्या, ये आत्या. "

" काय ग " कंटाळून जरा मोठ्यानंच उषानं विचारलं. समोरच्या खुर्चीकडे बोट दाखवून हळूच पण फिसक्या आवाजांत भाली म्हणाली,

" तो बघ तुझा नवरा ! "

" भाले—काय हें ! भालीच्या तोंडावर तिनं हात ठेवला आणि पुढं पाहिलं. अतिशय उंची सूट पेहरलेला एक गोरापान तरुण त्या खुर्चीवर बसला होता. त्यानं खुर्चीच्या हातावर कोपर टेकून हाताच्या ज्या तळव्यावर गाल टेकला होता त्या हाताच्या बोटातील हिऱ्याची अंगठी लखलख करीत होती तिचे किरण एकदम उषाच्या डोळयांत शिरले. आणि मघापासून जो अत्तराचा दरवळ तिच्या मनाला सुखवीत होता, तो त्याच्याच अंगावरून येत होता हेहि तिच्या लक्षात आलं. केव्हापासून ती खुर्ची रिकामी होती, तो तिथं केव्हा येऊन बसला, हें तिला समजल नव्हतं.

आता भाली तिच्या मांडीवरून खालीं उतरली. त्याच्या खुर्चीच्या पाठीवर हात टेकीत ती पुनः म्हणाली—

" आत्या, तुझा नवरा बघ. तिनं असं म्हणायला आणि गाणं संपायला गांठ पडली होती. ती जें म्हणाली ते स्पष्ट त्याला ऐकूं गेलं होतं. त्यानं चमकून मागे पाहिलं ती धिटुकली पोर ओठावर बोट ठेवून मिस्किलपणानं त्याच्याकडे पाहात होती. गालात ठेवलेल्या लिमलेटच्या गोळीचा फुगा मोठा मजेदार दिसत होता. ती कुणाला अन् काय म्हणाली याचा त्याला बोध झाला नव्हता तिच्या गोड लकबीवर खूष होऊन त्यानं विजारीच्या खिशातून एक चॉकलेटची वडी काढली अन् तिच्या हातावर ठेवत तो म्हणाला—

" काय, छान आहे ना—आवडेल ना तुला "—

आता तर काय, भाली खूष होऊन गेली. चॉकलेट तर तिला आवडतंच होतं. पण तिला जें मोठं आकर्षण वाटत होतं, तें त्या वडीवरील चमकदार वेष्टनाच्या कागदाचं ! ती त्याच्याजवळ सरकत म्हणाली,

" माझ्याजवळ किती अशा खूप खूप चांद्या आहेत ! "

" चांद्या—? " तिचा पारिभाषिक शब्द त्याला कळला नव्हता.

" ए, भाले इकडे ये बघूं "--

" मी नाहीं जा " आणि मग अंक संपेपर्यंत ती त्याच्या शेजारींच उभी होती. आणि दोन वड्या तिला मिळाल्या होत्या. त्याच्या माडीवर वेष्टनाचे कागद मांडून त्याचे चमकदार रंग तोलून पाहण्यात ती सगळं काहीं विसरून गेली होती.

अंक संपताच तो बाहेर जाण्यासाठीं उठला—

" मी येऊं ? "

" हो चल—खाऊ हवा ना ? "

" भाले—बघ हं--मार देईन--ये पाहूं—" आता मात्र भालीचा लाघटपणा असह्य वाटून उषा उभी राहिली त्यानं आता मागे वळून पाहिल तो हंसला—

" येईना—"

" पण—" ती तिला धरण्याला पुढें झाली.

" हिचे वडील"—त्यानं उषाच्या शेजारच्या खुर्चीकडे नजर टाकत म्हटलं.

"ती–ती भाची आहे माझी !" तिच्या शेजारच्या खुर्चीवर एक बावळट खप्पड गृहस्थ बसला होता " याना अस वाटलं तरी कसं "—तिन पुन्हा एकदा त्या गृहस्थाकडे नजर टाकून नाक मुरडल्यासारखं केलं.

" बरं चल—जाऊं. " त्यानं भालीचा हात धरला. भाली उड्या मारत म्हणाली.

" आत्या, मी जाऽतें. तुझ्या नवऱ्याबरोबर जातें ! "

" कार्टें—"

" काय म्हणायचं आहे तिला—"

" ऐकू नका हो तुम्ही-द्वाड आहे कार्टी ! "

" ऐकूं नका काय ? ऐकलं तर खरं—" तो हंसला.

ती मनाशींच चडफडत जागेवर येऊन बसली अपरिचित तरुणानं असं अगदीं परिचय असल्यासारखं बोलावं—हंसावं—तिला तें आवडलं

आणि आवडलं नाहीं ! तिला राग आला आणि ती त्याचं तें वाक्य आपल्याशींच उच्चारून हंसलीहि. एक दोनदा तिच्या दारावरून एक भली मोठी रस्ता भरून टाकणारी शुभ्र मोटर गेली होती आणि त्या मोटरींत त्या तरुणाला तिनं ओझरतं पाहिलं होतं. तें तिला आठवलं. आतां घरीं गेल्यावर छडीनं फोडून काढायची भालीला—असा तिचा मनाशीं बेत चालला होता, तोंच घंटा झाल्या आणि मखमलीचा पडदा डौलदारपणें सरकत सरकत वर गेला.

भाली पळत पळत आली ती तिच्या मांडीवर चढून बसली.

" आत्या, आम्हीं काय काय गंमत केली ! आयस्क्रीम घेतलं. ही घे तुला सुपारी." आपल्या चिमुकल्या मुठीतनं तिनं आणलेली सुपारीची पुडी आत्याला देऊं केली. आत्याला सोडून आपण गंमत केली ही गोष्ट तिच्या मनाला लागली असावी !

" किती छान आहे त्याची मोटार—आपण जाऊंया मोटारींतून ?"

" गप्प बसतेस कीं नाहीं—" उषानं खुर्चीकडे येत असलेल्या तरुणाकडे पाहिलं आणि भालीला चिमटा घेतला.

मग आत्याला भिऊन म्हणा किंवा खूप मजा केल्यानं कंटाळून म्हणा, भालीची बडबड बंद झाली. तरी पण एकदां ती उठलीच.

" अहो, आमच्या आत्याच असलं एक पातळ आहे. छाऽन आहे. माझं पण आहे. " रंगभूमीवरील रुक्मिणीचं पातळ पाहून तिला हें आठवल असावं. पातळाचं कौतुक करण्याच्या नादात आपण फार मोठ्यानं बोललों हें तिच्या लक्षात आलं नाहीं.

" शुक् शुक् " असे आवाज ऐकताच ती बावरली आणि चटकन् त्याच्या मांडीवर जाऊन बसली. नाटक संपेपर्यंत मग ती तिथून उठली नाहीं कीं बोलली नाहीं.

शेवटचा पडदा पडताच उषा उठली.

" भाले, चल लवकर " दाराशीं गर्दी उसळली होती. त्यातूनच जाण्याचा तिचा विचार होता.

" थांबा थोडा वेळ—गर्दी कमी होऊं द्या"—तो न विचारताच म्हणाला.

" छे छे, मग ठळकवाडीची बस नाहीं मिळणार—" भालीनं एकदम पाय आपटले

" मी नाही जा. मी ' बस् ' नं नाहीं येणार ! मी पांढऱ्या मोटारीनं जाणार. "

उषानं तिचा हात ओढला तसा तिनं गळा काढला

" बरं बरं मोटारीनं जाऊं हं " त्यानं तिची पाठ थोपटत तिची समजूत घातली

" आता काय करावं तरी "—उषा हतबुद्ध झाली. बाहेर येतांच तो मोटरीकडे वळत उषाला म्हणाला,

" चला मलाहि ठळकवाडीलाच जायचंय. मी पोंचवतों "

" नको नको. "

मालकाचे शब्द ऐकून शोफरनं सफाईनं मोटरचं मागच्या बाजूचं दार उघडलं. भाली टुणदिशी आत जाऊन बसली. तो तरुण पुढच्या सीटवर बसत म्हणाला—

" बसा ना—कुठेशी जायचं तुम्हाला "

नाइलाजानं ती गाडींत चढली. तिनं पत्ता सागताच शोफरनं मोटर सुरू केली. स्टेशन मागें पडलं, पुलाचे खांब अंधारात दिसत नाहीसे झाले. कॉम्रेस रोडवरील दिव्यांची माला तरळत गेली अचानक मोटर थांबली संकोच, भीति, राग, कृतज्ञता, आणि नवीनच कांहीं तरी, या सर्व भावनांचा भार सहन न होऊन उषाला घुसमटल्यासारखं झालं होतं.

" भालाबाई उतरा—आलं तुमचं घर. " त्याचा आवाज ऐकतांच ती भानावर आली.

" अय्या ! किती लवकर आलं घर—"

" हो ना, फारच लवकर "—त्याच्या बोलण्यात दोन अर्थ आहेत हें तिला जाणवलं मोटरीतून उतरताना एक गोष्ट तिच्या लक्षात आली. आपण किती बावळट—खरंच ! पत्ता सागून झाल्यावर त्यानं विचार-ल्यावरून तिनं आपलं नावंहि त्याला सागितलं होतं.

" कुठें शिकत असता ? "

" राणी पार्वतीमधें बी. ए. च्या वर्गात. " इतकं सागितल्यानंतर ती जी गप्प बसली होती ती आतापर्यंत. त्याचं नाव तरी विचारून घ्यायला हवं होतं कीं नाहीं !

मोटरच्या दाराशीं उभं राहून भालीच्या केसाशीं खेळत ती संकोचानं म्हणाली.

" तुमचं-तुमचं नांव वगैरे मला कांहीं ठाऊक नाहीं. "

" श्रीनिवास. "

" या ना, कॉफी घेऊन चला. दादाची ओळख करून देतें. नाहींतर तो म्हणेल—"

" हो तेंहि खरंच. पण फार वेळ नाहीं. नुस्ता तुमच्या बंधूंना सांगून जातों. "

तिच्या मागून तो घरांत आला. भाली स्वयंपाकघरांत पळाली. मधल्या हॉलमधे त्याला बसवून कॉफी करण्याकरतां ती स्वयंपाकघरात गेली. तिचा दादा घरीं नव्हता.

वैनी तिची वाट पाहात होती.

आपण जॉर्जेटचं उंची पातळ नेसलों आहोंत याचं भान न राहतां उषा एकदम फतकल घालून वैनीपुढें बसली.

वैनी या तुझ्या पोरीला घेऊन मी आता कुठं कुठं जाणार नाहीं. तिनं दोन्ही हातांनीं आपलीं कानशिलं दाबलीं.

" अग बाई ! त्रास दिलान् वाटतं. "

" नाहीं हो—"

आणि मग कॉफी करत तिनं सर्व हकीगत सांगताच वैनींनं तोंडावर बोट ठेवीत म्हटलं,

" कठीण ग बाई—" आणि त्या हंसल्या.

" हसता काय—तुम्ही काहीं तरी बोलता—तिला शिकवता आणि माझी तिनं फजिती केली. तुमचाच मला राग आला आहे " तिच्या डोळ्यात पाणी देखील गोळा झालं.

ती कॉफी घेऊन आली तेव्हा श्रीनिवास भिंतीवरील निसर्ग चित्रं पाहाण्यात गुंतला होता.

" कुणाचीं चित्र हीं ? "

" आमच्या दादाचीं. त्याला नाद आहे—तो बाहेर गेला आहे नाहींतर आता ओळख—"

" किती सुंदर आहेत —"

" याहून छान आहेत तीं माडीवर त्याच्या स्टुडिओंत आहेत "

" पाहिलीं पाहिजेत..."

" रविवारीं या त्या दिवशीं तो घरींच असतो "

" बरं " म्हणत त्यानं कॉफी संपवली.

इतक्यात भाली दुडू दुडू धावतच आतून आली तिच्या हातात दोन कागदाचीं खोकीं होतीं.

" या बघा माझ्या चांद्या "—तिनं त्याच्या समोर प्रदर्शन मांडलं.

" माझं पातळ दाखवूं ? "

" आता नको. मग हं " म्हणत त्यानं तिला जवळ घेतलं. आणि तिचा पापा घेतला.

त्याच्या गालावरून हात फिरवीत ती म्हणाली.

" तुमचे गाल कसे मऊ आहेत. आमच्या दादांचे गाल टोंचतात. काटे आहेत त्याला..."

" भाले. " वैनी दाराआड उभ्या असाव्यात. त्यांची दटावणीची हाक ऐकताच भाली श्रीनिवासला अधिकच बिलगली.

श्रीनिवासच्या हशानं हॉल भरून गेला होता. आणि उषाला आपण हंसाव कीं रडावं हें समजेनासं झालं होतं.

श्रीनिवासची मोटार निघून जाताच उषानं दार बंद केलं. दाराला बोलट घालताना ती मनाशी म्हणाली,

" रविवार. "

ती स्वयंपाकघरात येताच वैनी तिला म्हणाली—

" वन्सं, इतकं कांहीं रागवायला नको हो भालीवर ! "

" पुरे ग " म्हणत ती पातळ बदलण्यासाठीं आपल्या खोलींत गेली.

आणि मग तो रविवार लवकर येईचना. तिच मन तिच्यावर सारखं जळफळत होतं.

' रविवारींच दादा भेटेल असं कां सांगितलंस. रोज संध्याकाळीं भेटतो असं सांगितलं असतंस तर काही बिघडलं असतं होय ? बावळट आहेस मुलखाची "

रविवारीं तर श्रीनिवास तिच्या घरी आलाच होता. पण मग तो वरचेवर येत होता दादाच्या खोलींत तास तास बसत होता. हॉलमध्यें उषाशीं बोलत बसे. मग चहा होई आणि मग तो जाई. त्याच्या वडिलाची मुंबईस एक फर्म होती. तिच्या काहीं कामासाठीं स्वत च्या मोटरनं तो बंगलोरला गेला होता, आणि वाटेंत त्याच्या एका गुजराथी मित्राच्या आग्रहानं ठळकवाडीस उतरला होता. त्याला येऊन आठ दिवस झाले होते; आणि पंधरा दिवस तो राहाणार होता त्यालाहि चित्रकलेचा नाद होता. तिच्या दादानीं आणि त्यानं एक लॅंडस्केपहि काढलं होतं.

संध्याकाळीं तीं सगळीं मिळून फिरायला जात. पण बहुतेक तिला एकटीलाच जावं लागे. कारण दादाचं काहीं काम निघे. वैनींना स्वयंपाक करायचा असे. आणि भालीला कुठं न्यायचं नाहीं याबद्दल तर तिनं कानाला खडाच लावून घेतला होता.

एकदा ती फिरण्यासाठीं म्हणून मोटरींत बसत असतांना त्यानं म्हटलं होतं,

" तसा मी नुकताच मोटर हाकायला शिकलों आहे..."

" खरंच—मग कांहीं धोका नाहीं ना ? "

" बाहेरच्या माणसाना नाहीं–" तो मिस्किलपणें म्हणाला.

बसण्यासाठीं म्हणून उघडलेलं त्याच्या बाजूचं दार पुनः बंद करून ती मागें येऊन बसली.

" आज माझ्या हातून कांहीं अपघात घडावा अशी तुमची इच्छा दिसते." सफाईनं एका वाकणावर मोटार वळवीत तो म्हणाला.

" ती कशी काय ? "

" म्हणजे मला सारखं तुमच्याकडे पाहण्यासाठीं मागें बघावं लागणार आणि पुढें—मागं का बसलात ? "

" धोक्यापासून दूर असावं आपलं "–

तो मोकळेपणान हसला.

" चावटपणा पुरे. या पुढं या "

मनात असूनहि ती मग पुढं गेली नाहीं. आपल्या संकोची वृत्तीचा तिला राग आला.

त्याला आतां मुंबईस जायला दोनच दिवस उरले होते रेक्सला चागलं पिक्चर आलं होतं तें सर्वांना दाखवण्याचा त्याचा बेत होता. तो लवकर मोटर घेऊन त्याच्या घरीं आला. तो आला त्या वेळीं दादा दाढी करत बसला होता. वैनी चहाच्या गडबडींत होती. भाली कुठं शेजारीं गडप झाली होती. त्यानं उषाच्या दारावर टक टक केलें.

'ये ये' आपली कुणी मैत्रीण आली असेल या कल्पनेनं उषा पुढं झाली. तिचं सारं प्रसाधन आटोपलं होतं स्नो, पॉवडर, सुवासिक तेल आणि अत्तर यांच्या संमिश्र वासानं खोली भरून गेली होती. अत्तराची बाटली तिच्या हातातच होती. रुमालावर थेंब टाकून साडीला वास पुसून बोटाचं उरलेलं अत्तर ती कानाच्या पाळ्याना पुसत दाराशीं आली.

श्रीनिवास दारांत उभा होता.

" तुम्ही ? "

" ओहो—किती छान दिसतेस " तो हंसत असं म्हणत आत आला.

" तुम्हीसुद्धा किती सुंदर दिसता " अस तिला म्हणायच होतं.—पण तिची जीभ उचलली नाहीं. ' असल्या वेड्या संकोचानं आपण आपल्या आयुष्यातले किती सुंदर क्षण डावलून टाकतों नाहीं ? ' तिच्या मनात येऊन गेलं.

" हें माझं फार आवडतं सेंट आहे. "

" खरंच ? " तिला तें माहीत होतं म्हणूनच तिनं तेंच खरेदी केलं होतं. पण ही गोष्ट त्याला कळावी अशी तिची इच्छा नव्हती.

" या ना बसा." तिनं टेबलाजवळची खुर्ची पुढं केली. पण तो उभाच होता. टेबलावरील मोठ्या आरशात त्याचं देखणं प्रतिबिंब उमटलं होतं. टेबलावरील वस्तू आवराव्या म्हणून ती गेली, तों तिचंहि प्रतिबिंब आरशात आलं.

" उषा, समोर बघ–"

" इश्श ! "

त्यानं तिला जवळ घेतल्यासारखं केलं.

" आऽत्या – " दाराच्या पडद्याआडून तांबडालाल फ्रॉक दिसला आणि टाळ्या ऐकूं आल्या.

ती चटकन बाजूला झाली. आणि तो शीळ घालत खिडकींतून बाहेर पाहूं लागला.

भाली आंत आली—

" आत्या, मीं बघितलं ! " म्हणत ती उषाला जाऊन बिलगली.

" कार्टे, देऊं का थोबाडींत ! " ती रागावली पण शेवटीं हंसलीच.

" श्रीनिवास, आमचे दादा किनी – निशीला असंच करतात–मीं बघीऽतलं."

" जातेच कशी–" म्हणत उषा तिथून पळाली.

चहासाठीं सगळीं हॉलमध्यें जमलीं होतीं. आणि उषा सारखी भालीच्या मागं लागली होती.—

" भाले, ए भाले, मोटरींत जाऊन बस जा. जा. पम् पम् कर जा. जा कीं–"

तिची ती तारांबळ पाहून श्रीनिवास तिच्याकडे पाहून हंसला.

" भाले जा ग—"

" वन्स, पण असं तिच्या कां मागें लागता ? राहीना बिचारी–"

पण ती भालीच्या मागें का लागली होती हें ती वैनीला सांगणं शक्य होतं काय ?

• • •